

# अनुक्रमाणिका



---

# बाभळवनांत

'खबरदार किसन!' राधिची म्हतारी गागली, 'पोरीचा हात धरत जाऊं नगस–आतां शारदा कायदा झालाया–' म्यां तसाच हात सोळडा नि म्यापल्याशींच म्हनलं, कीं गा, जिथं सथाची सासूच होनारी आपल्या साकारपुड्याच्या बाइलीचा हात धरला, तरी आपनास्नी कायदा दावत्ये, तिथं मानसानं काय करावं? म्हून म्यां राधीकडं पाहिलं. तिचे डोळं नकसत्रावाणि चमकत व्हते–तव्हा म्या शाप म्यापल्यालाच सांगितलं, कीं मर्दा, जिथं तुझ्या राधिची गहिरी नंदरच बोलावतिया, तिथं त्योच मोटा कायदा. तव्हां तिला खुनावलं कीं 'शिवंपल्याडल्या बाभळवनांत,' नि म्हतारीला इचारून, नि यकदां माज्या राधिकडं ढुंकून पाहुनश्यान मी निघालो.

* * *

लइ द्वाड ती अवा, राधीच्या बापाची पाटाची बाइल. तिच्या घरांत राधीला राबाया लावावं ह्येंच तिचं काम. माझं राधिशि लगीन ठरलं, त्या येळला राधी त्येरा वरसाची व्हती–तेव्हांपासून पाहतुया, तीन पावसाळं ग्येलं तरी त्या तिच्या सटवाईचा, त्या मैनाबयाचा, शारदा कायदा हैच. दर खेपंला मी जातोया, तेव्हां राधि न्याहाऽर नजरनं पाहायची, पन् या थेरडीचा खडा पाहरा तथं; कव्हां कव्हां वाटायचं कीं रांडला लाथ मारून बाजूला काढावी नि राधीला खांद्यावर टाकून निघून जावं–पन बायका-मानसाच्या अंगावर हात कसा टाकावा–ती काय आपली बाइल हए? तशी माजि राधि मोठी चटकचांदनी है! तिचा हात येकदा जत्रत कुणि दाढीवाल्यानं जाता जाता धरला–त्यव्हा तिनं फाडफाड त्याच्या मुस्काटात मारल्या अन् म्यां तर त्याचं कंबडंच मोलडं!–चार म्हइनं जाऊन आलो नव्ह कां. राधीचं आंग म्हनजे जसा चिंचचा फोक, ती चालती तव्हां मला वाटतं, कीं बापू मास्तराच्या छडीवानि हिचा छम् छम् आवाज निघल! क्यास कसं वाळ्याच्या मुळ्यावानी! नि नितळ, घांसलेल्या तांब्यावाणी कांत, बिजलीवानि डोळं–नि सदा ते आपल्याकडे लावललं!–उभ्या मक्याच्या कनसातल्या दान्यांच्या ओळिवाणी तिचं दांत, तिची मान किती गोल, तिचं नेसनं किती ऐटीचं–अन् तिचं हळू बोलणं

किती ग्वाड ! जी–हांसू नका, आपल्याला बा राधिची याद आली म्हंजि देहेभानच इसरतं !

मग तवा मी खूप इचार केला, कीं राधिला कशी उचलावी, पण माझ्या राधीनबी डोकं लढवलं बघा–लइ चलाख पोर, राधी ! मागल्या सालाला, शान्ताबयाच्या जत्रत म्या दोन कुस्त्या मारल्या, नि तथंच तिन्हीसांज तिची माझी डोळेभेट झाली. मंग म्या माझ्या सवंगड्याना हुकवून, तिच्यावर नंदर ठेवली; म्हातारी–मयनाबया, लुगडीं पाहाया वाकली–तशी आम्हीं दोघं धूम पळालों; माज्या मावशीच्या प्वाराची–सदबा सांवताची–गाडी उभी व्हती; चांदण्यात ज्ये पळवलं बइल, ते न्याहारिच्या वख्ताला घरिं पोचायाच ग्येलो न ? दोन कोसाचा टप्पा, सारी रात लागली गांठाया !

तीनच दिस ( नि रात ) राधी माझ्याजवळ राहिली नसल, तों आली की मयनाबया ! अरे बापरे, अशी कडाडली, अशी कडाडली कीं समदा गांव गोळा केलान् ना ! म्या म्हनलं कीं पाटील सवथा आलं–त्या बयापुढे बाबाला त्वांड उघडायाबि न्हाइ मिळालं बरं !–तव्हां त्यांच्यासाठीं पाटवावी. त्ये हलक्येच म्हनाले, कीं पोरा, दम धर–पुढल्या वर्षी धरित्री शपथ—

पन मला दम धराया येइना, म्या माझि कुस्त्यांची कडीं, तोडे, पागोटीं, समदीं इकुनशान् एक घोडं खरेदी क्येलं, नि आतां रोज रपेटीला म्हून या गावाला यायचं, वेशीबाह्यरच्या खंडोबाजवळ घोडं बांधायचं नि ओढ्या अल्याडुन, पल्याड पाटलाचा परस यायचा, तिथल्या राधीला काळ्या चिमणीवाणि शीळ द्यायची—

* * *

आज मयनाबया कुरड्या कराया गेली म्हून राधी म्हनली–ग्येलो धीटपणं घरांत. सांवल्या जायच्या सुमारास घरांतनं राधीला सोडून–पन् पाय निघनां, तिचा हात सोडवना–तशांत म्हातारीनं येऊन पाह्यलं नि ती अशी गागली.

शिवंबाह्यर मीं चाललो तो माझ्या पाठोपाठच राधी एखाद्या हरणीवाणी उडत आली कीं ! मीं लइ खुशीत इचारलं—

'राधे, इतक्या लौकर कशी सुटलीस ग ?'

'आपन ओढलंत कीं मला इकडं—'

'आपन ?'

'तुम्हीं नाहीं बोलावलंत—इथं उभं राहून ?'

'तुम्ही ?'

'तूं—किसन—तुझ्याकड यायच्या येडात निघाल्याव कोन अडिवनार है मला ?'

'मीं'

'चल जा--' म्हून कोयत्याच्या धारेवानि हांसून राधिनें आंग टाकलं—म्या झेलाया. पोरींचं त्वांड संमद घामानं नुसतं डंवरलंया, नि पदरानं माझा घाम पुसाया निघाली! माझ्या डोक्यापंत पदर बी पोचंना तिचा!

'चल' म्या तिच्या कानांत म्हटलं.

'कुठं ?' तिनं कमळाच्या तळ्यावाणी डोळे वर करून इचारलं.

'बाभळवनात—' म्हून म्या तिला उचलून घ्यून निघालो.

माज्या हाताच्या डोलीवर पडून, माज्या छातीवं डोकं टेकून, नि माज्या गळ्यातल्या पेटीशीं चाळा करीत, राधी हळूच म्हनती काय,

'राया, बाभुळवनांत काटं हैती न रे ?'

'सख्ये, वाटाबी हैत बाभळवनांत—'

आमच्या त्या बाभळबनाची सर तुमच्या शारगावच्या बगिच्यालाबी कंदी यायची न्हाइ. पावसानं कातळाच्या मधूनमधून नि कडंकडंला हिरवीशार जनु झालर आलिया, अन् बाभळींच्या काळ्याभोर खोडावर नि डहाळ्यावर जनु हिरवीं दगडं कुटुनशान् त्यांचा भुगा कुनि फेकलाया. त्या बाभळबनाच्या अगदीं मधून वढ्याचं वळण—वीस हात निर्मोळ रेती, नि गुडघाभर निर्मोळ पानी—मला कंदीकंदी वाटायचं, ही वळणाची चमक माज्या राधीच्या हांसन्यावानींच हए. त्या वळणाच्या वर एक मोठा हत्ती—खडप हाये, अगदीं पान्याच्या कडला; तथं मउमउ क्षारड्या शेवाळाची जनू शेजच घातलिया. त्या जाग्यावं पडून आम्हीं आभाळातल्या चांदन्यांकडं पाहावं—अन् मंग बाकीचं जग है कां न्हाइ याचं भानबी न्हाइ नि पर्वाबी न्हाइ!

* * *

या दिशीं आम्हीं जाऊन तथं टेकलो न टेकलो तोच जवळून पुश-काळ मानसं एकदम बोलल्याचे आवाज ऐकाया आले—आम्हीं दोघं ताड-कन् उठूनशान बसलो. ती मानसं आमच्याकडंच येत व्हती. धा बारा शारगांवचीं मानसं व्हती तीं—आम्हां दोघास्नी पाहून त्यांचीं त्वांडं गोरींमोरीं झालीं. राधी मला बिलगून पन त्वांडावर पदर धरून उभी व्हती; जव्हा त्या लोकांतबी दोनचार चसमा लावलेल्या अवा हैत असं पाह्यलं, तवा त्यास्नी पाहून राधीबी धीट झालीया.

तीं मानसं आपल्यापल्यांत कुजबुजत होती—'मास' 'कंत्राट,' 'ह्ये चालतील,' 'इचारा,' म्हून सबुद माझ्या कानावं आले, त्यासरशीं म्यांच म्होरं हूनशान म्हनलं, कीं दादानों ह्यो खाटीकखान्याचा रस्ता नव्हं, तव्हां तीं समदीं शरमिंद्यावाणी हांसलीं. त्यांच्यातला एक बावा पुढं हून म्हनला, 'अरं आम्हीं शारातले लोक खेडुतांशीं दाट संगशटन करन्याच्या हेतूनं इथं उपासतीथ झालो हौत—' राधी हांसायाच लागली, पन म्यां तिला चिमटा घ्यून गप्प केली. तिला यांच्या बोलण्याची इक्ती मजा वाटली कीं तिनं त्या समद्यांचं बोलणं तस्संच्या तस्सं ध्यानात ठेवलंया, नी नेहमीं त्यांची स्वांगं आनती. मोटी हुशार है माझी राधी !

दुसरा एक लांबक्यासाचा खप्पड फुटक्या नरड्यानं बोलला 'शेतकरी भाई, आपुन शरमजीवी दळित वरगाच्या कामकऱ्यांनीं व शेतकऱ्यांनीं ऐऽऽऽक्य करून करामतीची परभात जवळ आनली पाहिजे'—आतां मात्र मींबी हांसलो.

तव्हां त्यांच्यातली येक अवा काय म्हनली, कीं यास्नी आपुन गोष्टी सांगू म्हंजी तरी यांना कांहीं कळल.

म्हून त्या चादऱ्यांत आम्हीं समद्यांनीं कोंडोळं घालून बसून त्या लिवल्यापुसल्या लोकांनीं आम्हास्नी गोशटी सांगितल्या. त्या ऐकतां ऐकता आमास्नी झ्वाप लागली, पन त्यानीं त्या लिवूनशान आनल्या व्हत्या गोशटी—मी नग नग म्हनलो तरी त्यांनीं त्या माज्या गळ्यान बांधल्या—त्येच ह्ये कागूद.

———

# " १९८३ चें पुणें "



## ( १९३३ चें दुःस्वप्न—जेव्हां पुण्याला डामरी रस्ते नव्हते )

इसवी सन १९८३च्या ऑगस्ट महिन्यांतील गोष्ट. पुण्यांतल्या चिखलाला कंटाळून, बरोबर पन्नास वर्षांपूर्वी सहारा वाळवंटांत जाऊन राहिलेले तरुण धोंडोपंत आतां वृद्धपणीं आपल्या पुण्यग्रामाच्या पुण्यदर्शनार्थ परत आले होते. तिकडे सहाऱ्यांत त्यांचा जम चांगला बसला होता; उंटाच्या लेंड्यांच्या गोवऱ्या लावून व खजुरीच्या बियांच्या माळा करून विकण्यापासून, पन्नास वर्षांत तितक्याच उंटांचा तांडा बाळगून त्यावर 'भाडें' करण्याच्या स्थितीला ते येऊन पोहोचले होते.

आपल्या पुण्याची प्रगति मागसलेल्या सहाऱ्यापेक्षां कितीतरी जास्त आहे, अशा बढाया तेथील भटकत्या अरब टोळ्यांपुढें मारतां याव्या म्हणून ते पुण्यास येऊन जात होते.

मुंबईला टपाल—विमानानें येऊन ते 'लोकल' विमानानें खडकीच्या मैदानावर येऊन उतरले. गांवांत येण्याकरतां त्यांनीं मोटरचा शोध केला, पण त्यांना असें कळलें कीं, 'फरसबंदी रस्ते करण्याचा घाट घालून, रस्त्यानें दुतर्फा जाणाऱ्या नागरिकांच्या अंगावर चिखल उडविण्याच्या आपल्या न्याय्य हक्कांवर बुद्धिपुरस्सर व खोडसाळपणानें गदा आणण्याचा म्युनिसिपालिटी प्रयत्न करीत आहे असें समजून मोटार—हाक्यांनीं संप पुकारला आहे. त्याचप्रमाणें शत्रूच्या शीलावर शाब्दिक शिंतोडे उडविण्यास कायद्यानें केलेल्या हरकतीमुळें त्यांच्यावर चिखलाचें शिंतोडे उडवून समाधान मानणाऱ्या खासगी मोटार—मालकांचाही संपास पाठिंबा आहे.' हें ऐकून धोंडोपंतांनीं टांग्याचा तपास केला, तेव्हां त्यांना समजलें कीं साधे टांगे फक्त शहर म्युनिसिपल हद्दीपर्यंत जातात, पुढें पाणघोड्यांच

तरता टांगा करावा लागेल. त्याप्रमाणें साध्या टांग्यानें ते खडकीच्या व पुण्याच्या मधल्या सीमेपर्यंत येऊन पोहचले. त्या ठिकाणीं खैबर घाटा-जवळच्याप्रमाणें सरकारनें मोठ्या लाल अक्षरांत पुढील नोटीस लावली होती:—

"पुणें शहर म्युनिसिपल हद्दींत जाणारानें स्वतःच्या जबाबदारीवर जावें; त्याला कांहीं झाल्यास सरकार जबाबदार नाहीं."

धोंडोपंतांनीं मनाचा हिय्या करून एक पाण—टांगा ठरविला; या वाहनास पाणघोडा जोडला असून चाकांचा ऐवजीं चिखलावर घसरणाऱ्या घसरगुंड्या (Skates) लावल्या होत्या; टांगेवाला बी. ए. होता. त्यानेंच धोंडोपंतांच्या प्रश्नाला वेळोवेळीं उत्तरें दिलीं, व वाटाड्याचें काम केलें.

लॉईड पूल ओलांडल्यावर धोंडोपंत भांबावल्यासारखे झाले; त्यांनीं विचारलें "हें काय? शनिवारवाडा कुठें आहे?"

टांगेवाला आश्चर्यानें उद्‌गारला, "शनिवारवाडा? इथें तर मोटर-स्टँड व कचराडेपोच वरींच वर्षें आहे—हो बरोबर—इथें एक पडीक वाडा होता खरा, पण शहर सुधारणेला त्याची अडचण होते म्हणून कमिटीनें तो पाडून त्याचे बदली आठवण म्हणून पत्र्याचा एक सुरेख शनिवारवाडा रे म्युझियममध्यें ठेवला आहे—"

"वाहवा! बरें, निदान अंबरखान्याचा हौद तरी शाबूद आहे कां?" धोंडोपंतांनीं विचारलें.

टांगेवाला हांसला, "छट्! जुने हौद बुजवून साफ केल्याला आज चाळीस वर्षें झालीं, त्यांच्या स्मरणार्थ ड्रेनेजच्या म्यान होलाना मात्र जुन्या हौदांचीं नांवें दिलीं आहेत—"

"उत्तम! बरें विश्रामबाग वाडा तरी?"

"तो मात्र भक्कम केला आहे. तिथें कमिटीची कचेरी बरेच दिवस होती म्हणून तो राहूं दिला आहेच, पण लोखंड शिमिटानें चांगला आकार आणून आतां तो थेट ग्रीक पद्धतीवर बांधला आहे."

या वेळेपर्यंत टांगा बराच पुढें गेला होता; पण घरें वगैरे कांहींच दिसेनात. जिकडे तिकडे चिखल; मधून मधून एखादी इमारत अर्धवट दिसत होती, व कांहीं पत्र्याच्या झोंपड्या चकाकत होत्या. ड्रेनेजसाठीं

खणलेले चर व त्यांचे बाजूंस लावलेलीं कांटेरी कुंपणें पाहून लहानपणीं बोलपटांत पाहिलेली " पश्चिम रणक्षेत्रावरील पूर्ण सामसूम ! " धोंडोपंताना आठवली. त्यांनीं टांगेवाल्याला प्रश्न केला,

" काय हो गांव कुठें आहे ? "

टांगेवाला हाताच्या गिरकीनें सबंध क्षितिजाचें निदर्शन करून बोलला, " तें काय गांव ? पर्वतीच्या टेंकडीवर शुक्रवार पेठ; शिंद्याच्या छत्रीजवळ नानाची पेठ, वेताळ टेंकडीवर वेताळ पेठ, विठ्ठलवाडीला सदाशिव पेठ, येरंडवण्याला नारायण, भांबुर्ड्याला शनिवार व येरवड्याला सोमवार, राहिलेल्या लष्कराच्या हद्दींत—"

" मग या जागच्या जुन्या गांवाचें काय झालें ? "

" उभे व आडवे रस्ते रुंद करतां करतां, घरें सगळीं नाहींशीं झालीं व मैदान राहिलें. या मैदानांत फक्त सरकारी इमारती, म्युनिसिपालिटीच्या मालकीच्या इमारती व सध्यांच्या मेंबरांचीं घरें शाबूत आहेत. मैदानावर आतां रस्ते पांढऱ्या रेघांनीं व तांबड्या कंदिलांनीं दाखविण्याची सोय केली आहे, ते रस्ते ' करण्याची ' आतां जरूरच पडत नाहीं, कारण वस्ती कुठें आहे ? पोस्टासारख्या इमारतींत चिखलांतून उतरण्याकरतां कांहीं लोक येतात व त्यांच्या अंगावर चिखल उडवावयाला मोटारी येतात, एवढीच रहदारी. "

" बरें, शहरांतले लोक सगळे राहतात कुठें ? त्यांचे व्यवहार कसे चालतात ? "

" श्रीमंत लोक, एक्स्टेन्शन किंवा कॉलनीसारख्या नव्या भागांत राहतात, मध्यम स्थितींतल्या व गरीब लोकांनीं घरदार म्युनिसिपालटीला अर्पण करून, 'उत्पन्न तुम्ही घ्या व कराची रक्कम तेवढी आमच्या निर्वाहाला द्या, ' अशी मागणी केली होती; पण उत्पन्न तेवढें म्युनिसिपालटीनें घेतलें व लोकांच्या निर्वाहाची वेगळीच सोय केली आहे; आसपासच्या डोंगरांतील गुहा, लेणीं व मुंबईच्या इंप्रुव्हमेंट ट्रस्टच्या धर्तीवर बांधलेल्या चाळी यांतून नागरिकांची रहाण्याची सोय केली आहे; त्याचप्रमाणें रोज दोनदां फुकट अन्नदान केलें जातें, कारण वर्षांतल्या प्रत्येक दिवसाला

दोन या प्रमाणांत गेल्या ५० वर्षांत मयंत्या व जयंत्या भरपूर झाल्या आहेत. हें अन्न खाऊन रिकामपणीं एकमेकांच्या अंगावर चिखल उडविण्यांत लोकांचा वेळ चांगला जातो."

"सुधारणा तर खूपच आहे. आणखी कांहीं नवीन ?"

"हो हो ! नव्याला येथें तोटा नाहीं, पौड, पाषाण, शेलारवाडी, आळंदी, हडपसर व सासवड हीं गांवें तर कमिटीनें हद्दींत घेतलींच आहेत; जुन्या शहाराच्या जागीं शेतीला प्लॉट्स देण्याचाही विचार आहे. वेताळच्या डोंगरमाथ्यावर विस्तीर्ण तलाव बांधून ओंकारेश्वरापुढच्या मुठेच्या पात्रांत एक जंगी 'विहार पर्वत' उठविण्याचा बेत आहे; त्याचप्रमाणें विठ्ठलवाडीच्या मागून नदीचा फांटा फोडून तो पर्वतीच्यापुढें नागझरींत सोडून मुसलमानांना याप्रमाणें नदीचें ½ पाणी स्वतंत्र देण्याचें घाटत आहे. 'पाणलोटी' (फ्लशिंग) संडासाप्रमाणें विजेच्या बत्त्या, बागबगीचा व मोटार ह्या गोष्टी ठेवणें प्रत्येक घरमालकास सक्तीचे केलें आहे. शिवाय—"

"पुरे पुरे! फिरवा आतां परत टांगा; पण कायहो, तुम्हांला बरीच माहिती दिसते ?"

"मीही मेंबर आहे ना कमिटीचा ?"

"मग जुन्या ओळखीची एकही गोष्ट नाहीं का येथें ?"

"ती पहा ! ती 'काकाकुवा मॅन्शन'. तिच्यापुढील रस्त्याविषयीं कमेटीचा व इमारतीच्या मालकाचा तंटा अजून चालू आहे; सध्यां त्यांच्या घरापुढचा उतार १७८ व्या खेपेला बदलतो आहे. त्या तंट्याचा एकदां निकाल लागला कीं, हा हा म्हणतां कमिटी 'अॅक्वायर' करील ती जागा—"

"बरं तें जाऊं द्या—काय हो ? ते गृहस्थ कोण ?"

काकाकुवा मॅन्शनच्या भिंतीला लावलेली एक जाहिरात वाचीत एक अत्यंत वृद्ध गृहस्थ जागच्या जागीं उचलून पावलें टाकीत ( Marking time ) उभे होते. त्यांच्या अंगांत सोलापूर चेकचा सूट असून डोकीस दोन इंच जाडीची साहेबी टोपी होती. ते वाचीत असलेल्या जाहिरातीवर पुढील मजकूर होता. "स्वयंवर (बाल गंधर्व रुक्मिणीची भूमिका करतील)"

टांगेवाल्यानें खुलासा केला, "हे गृहस्थ पुण्यांतील एक जुनी संस्थाच आहे; यांच्या वयाची कोणासही कल्पना नाहीं; सकाळीं उठून दहा मैल फिरायला जाण्याचा त्यांचा क्रम चिखलानें अशक्य झाल्यामुळें हे जागच्या-जागींच दहा मैल चालून व्यायाम घेतात."

टांगा थोडा पुढें गेला तों एके ठिकाणीं एक विचित्र दृश्य त्यांना दिसलें; १२।१५ लोक एकसमयावच्छेदेंकरून आपल्या हातांतील निबंध वाचीत होते. सर्वांच्या मुद्रा निश्चयी असून त्यांच्या पांढऱ्या दाढ्या चिखलांत रुतल्या होत्या, व ते स्वतः कमरेइतक्या चिखलांत उभे होते. धोंडोपंतांनीं विचारलें "हे कोण लोक ?"

"**पन्नास वर्षांनंतरचें पुणें** ह्या संस्थेचे ते सभासद आहेत." टांगेवाला तुच्छतेनें हांसून म्हणाला.

झालें इतकें पुण्याचें दर्शन पुष्कळ झालें असें म्हणून धोंडोपंत परत फिरले. पण त्यांच्या शेवटच्या दृष्टिक्षेपांतदेखील त्यांना पुढील देखावा दिसणें टळलें नाहीं; तितक्या चिखलांतदेखील फिरायला निघालेल्या पेन्शनरांचा तांडा छातीचा नेट देऊन, वैतरणीच्या ऐन पात्रांत वाट विसरलेल्या म्युनिसिपल मेंबरांच्या आत्म्यांप्रमाणें चाचपडत चालत होता...

———

# राष्ट्रीय सभेची पूर्वतयारी



इतिहासांत म्हणे कित्येक गोष्टी चुकांमुळें अमर झाल्या आहेत. उदाहरणार्थ चुकून दिलेल्या हुकमामुळें बॅलाक्लॅव्हा येथील लाइट ब्रिगेडचा हल्ला चिरकालिक कीर्ति पटकावून बसला आहे. आमच्या खेळमेळयाच्या उत्पत्तीची गोष्ट अशीच आहे. ही ऐतिहासिक होणारी संस्था (पुण्यांत दोन अथवा अधिक लोक एके ठिकाणीं जमूं लागले म्हणजे संस्था होते.) एका क्षुल्लक चुकीमुळें अढळपद पावली. पहिल्यानें आम्हीं 'महाराष्ट्र स्पोर्टिंग क्लब' हें ऐटदार नांव धारण केलें होतें. आमच्यांतील सर्वांत जास्त इंग्रजी शिकलेला म्हणजे खंडू (मॅट्रिक–फेल); त्यानें 'स्पोर्टिंग'चें स्पेलिंग 'सी' नें सुरू केल्यामुळें आम्हीं एम्. सी. सी. झालों–मोठा प्रश्न उभा राहिला. अखेर विलायतच्या क्लबशीं घोटाळा नको, या खेळाडू वृत्तीनें (Cporting sprit नें) व अस्सल मऱ्हाठी नांव जास्त बरें, या देशाभिमानानें प्रेरित होऊन, आम्हीं 'खेळ मेळा' हें प्राकृत नांव धारण केलें. 'स्पोर्टिंग' या शब्दाच्या स्पेलिंगबद्दल आम्हीं खंडूचा कधींहि अनुदार संशय घेतला नाहीं, हें अभिमानानें नमूद करणें येथें आवश्यक आहे.

आमचे खेळ मर्दानी नव्हते. आमच्यापैकीं सर्वांत सुस्थितींत (म्हणजे वडिलोपार्जित मोडक्या घरांत) असलेल्या गणूच्या माळ्यावर आम्ही जमून मुख्यतः इतर लोकांच्या उठाठेवी करण्याचा खेळ खेळत असूं. कांहीं दिवसांनीं पत्ते आणून झब्बू, गद्धेकोट वगैरे डोक्याला व्यायाम देणारे खेळ व (बुद्धि वापरण्याची सक्ती नसल्यामुळें) बुद्धीबळें आम्हीं सुरू केलीं होतीं. अलीकडे एक कॅरमबोर्डही क्लबांत आला होता. पण आमचा मुख्य खेळ म्हणजे गांवांतल्या घडामोडींची चर्चा. दुसऱ्याच्या भानगडींत लक्ष घालून निरपेक्षपणें कांहीं कार्य करण्याकडे आमचा कल होता. आमच्या नम्र समाजसेवेच्या मानानें

आम्हांला पुण्यांत प्रसिद्धी बरीच मिळाली होती. पण आम्हांला लोकांची पर्वा नव्हती. 'कर्मण्येव्याधि—' का कायसेसें म्हणतात तसे आम्ही होतों; व शत्रूंच्या टीकेला न जुमानतां शक्य तितक्या चळवळींतून भाग घेण्याची आमची खटपट चालू होती.

उदाहरणार्थ, श्रीदाजी कॉलेजच्या गॅदरिंगच्या नाटकाचीं तिकिटें थिएटरबाहेर आम्ही स्वतंत्रपणें विकली. आमचा हेतु योग्य मोबदला घेऊन लोकांची करमणूक करण्याचा होता, थिएटरही नाहींतरी रिकामेंच पडणार होतें; मग आमचें काय चुकलें? पण कॉलेजवाल्यांना कुठलें हें पटायला ! त्यांनीं केवढा गहजब केला आमच्यावर ! अखेर त्यांच्या सेक्रेटरीला एक सिंगल चहा व प्रोफेसरला एक उपरणें दिलें तेव्हां तडजोड झाली.

त्याचप्रमाणें परवा 'भूकंप निवारण फंडा'ची गोष्ट. बिहारमधील पीडितांना मदत म्हणून अनेक संस्था फंड गोळा करीत होत्या, तसे आम्हीही करीत होतों. अन्तर इतकेंच, कीं पुण्यांत भूकंप झाला तर त्या नुकसानाच्या निवारणासाठीं आमचा फंड होता. आम्हीं सुरेख छापील पावत्यादेखील दिल्या, चारपांच पेट्याहि फिरविल्या—गल्ला चांगलाच जमला. गणूच्या माळ्याची दुरुस्ती व मेळेकऱ्यांचें जिलबीचें जेवण निघालें—पण कांहीं उद्योगी लोकांनीं आणलें कीं आमच्यावर कुभांड ! शेवटीं सर्व पैसे व पावतीबुकें चोरीस गेल्याची ग्वाही जेव्हां आम्हीं दिली तेव्हां सुटलों.

बरें, आम्ही नेहमींच स्वतःचा फायदा पहात होतों असेंही नाहीं. भारत इतिहास संशोधक मंडळाच्या त्या वार्षिक सम्मेलनांत आम्ही अगदीं निरपेक्षपणें भाग घेत होतों; तेथील रुक्ष व्याख्यानांच्या वेळीं करमणूक म्हणून ऐतिहासिक वातावरण निर्माण करण्याची आमची प्रामाणिक महत्त्वाकांक्षा होती. तत्प्रीत्यर्थ आम्ही वेगवेगळ्या ऐतिहासिक व्यक्तींचीं सोंगें घेऊन तेथें गेलों होतों. दाढी लावून गोप्या शिवाजी झाला होता, नामू धोकटी धारण करून जिऊ महाल्या बनला होता व मी काकांचें जुनें पागोटें घालून रघुनाथपंत हणमंते म्हणून गेलों होतों. आमचा थोडा हलगर्जीपणा झाला हें खरें. कारण, लक्ष न राहून 'शिवाजी' मिशा हातांत घेऊन व्याख्यान ऐकण्यास बसला; 'जिऊ

महाल्या'नें ऐन बैठकींत विडी शिलगावली आणि मी 'शीळ' या गाण्याची शीळ घालूं लागलों. त्या ठिकाणच्या गांभीर्याची हानी झाली खरी, पण पोलिस बोलावण्यापर्यंत इतिहास संशोधकानीं पाळी आणावयास नको होती. असो.

नुकतेच आम्ही नवीन कांहींतरी करावें असा विचार करण्यास बसलों होतों; इतक्यांत हरी आला; त्यानें बातमी दिली, कीं पुण्याला स्पेशल कॉंग्रेस होणार आहे. पहिल्यानें त्याच्यावर अर्थातच कुणींहि विश्वास ठेवला नाहीं. कारण तो अगदीं सरकारमान्य थापाड्या होता. सर्वस्वीं अविश्वसनीय व अशक्य बातम्या नेहमीं आणण्याची हरीला खोड होती. पण यावेळीं त्यानें पुरावा दाखविला. जेजुरीच्या 'येळकोट' या साप्ताहिकांत ती बातमी छापून आली होती. आम्हांला सर्वांना आनंद झाला. शंखू ( खरें नांव शंकर पण दुसरीच्या शेवटच्या बाकावरून पांच वर्षांनीं 'रिटायर' झाल्यावर ही पदवी मिळाली. ) वक्ता होता, तो ताडकन् उठून शिवाजी मंदिराच्या आवाजांत म्हणाला.

"गड्यांनो, आत्मोन्नतीसाठीं उत्साहानें उद्वेग—म्हणतों उद्योग—करण्याची ही संधी आहे. शिवरायाचें नांव आठवा, हा समर्थांचा महाराष्ट्र आहे, हें लोकमान्याचें पुणें आहे.

"बोला तर—"

"महात्मा गांधी की जय!" आम्ही गरजलों. मोठ्या हुरूपानें आम्ही कार्याची रूपरेखा आखण्यास बसलों.

दोनतीन दिवसांनीं एक मनुष्य स्थानिक कॉंग्रेस कमिटीच्या कचेरींतून एक पत्र घेऊन आला. त्या पत्रांत आम्हाला उद्देशून लिहिलें होतें कीं,

'पुण्यास होणाऱ्या राष्ट्रीय सभेच्या जादा अधिवेशनासाठीं तुमच्या लुडबुड्या मेळ्यानें कंबर कसली असेल हें जाणून तुम्हाला कळविण्यांत येत आहे, कीं कॉंग्रेसच्या बाबतींत तुमच्यापैकीं कोणाचीही मदत नको आहे. आमचे स्वयंसेवक अधिकृत असतील. त्याच्याशिवाय तुमच्यासारख्या उपटसुंभांशीं व्यवहार करूं नये असें आम्हीं सर्वत्र कळविलें आहे. याउप्पर जर तुम्ही हट्टानें या कार्यांत अडचण उत्पन्न कराल तर मारुति

आखाड्याला आम्हीं इशारा दिला आहे. इतकेंच नव्हे, तर तत्त्वाविरुद्ध पोलिसांची मदत घेण्याची आम्हाला नाइलाजानें वेळ येईल. तरी एवढ्यावरून समजून राहावें. ”

पण अशीं पत्रें अलीकडे आम्हाला नेहमीं येत होतीं. खंडूनें हें पत्र वाचून दाखविल्यावर आम्ही इतकें मात्र ठरविलें कीं काँग्रेसच्या बैठकीचें काम सर्वस्वीं स्वतंत्रपणें आपणच करायचें; इतरांशीं संबंधच येऊं द्यायचा नाहीं. या तत्त्वाप्रमाणें शंखूनें मेळ्यापुढें खालील विषयसूचि ठेवली—

**१ स्वागतः—**

(अ) प्रतिनिधींना स्टेशनावर व मोटारींच्या अड्ड्यांवर उतरून घेणें.
(आ) हारतुरे, फुलें, गुलाल इत्यादि
(इ) मिरवणूक व रस्त्याची शोभा.
(ई) पाहुण्यांच्या रहाण्याची सोय.

**२ अधिवेशनः—**

(ए) प्रतिनिधींच्या वाहनांची सोय.
(ऐ) तिकिटें.
(ओ) उत्तेजन किंवा निषेधाची व्यवस्था.
(औ) मंडपांतील सुखसोयी.

**३ इतर कार्यें:—**

(अं) पोट–कमिट्यांच्या सोयी.
(अः) पाहुण्याच्या स्थानिक संस्थांना भेटी.
(क) स्वदेशी प्रदर्शन व औद्योगिक बाजार.
(ख) कसला तरी फंड.

**४ करमणूकः—**

(ग) पाहुण्यांना पुणें दाखविणें.
(घ) नाटकाचा किंवा मेळ्याचा कार्यक्रम.
(ङ) काव्यगायन.
(च) समारोप व निरोप.

या मुद्यांच आम्हीं पद्धतशीर विवेचन सुरू केलें.

पहिली गोष्ट म्हणजे कॉंग्रेस स्वयंसेवकांचे बिल्ले पाहून आपण थेट तसेच बिल्ले तयार केले पाहिजेत, ही महत्त्वाची सूचना गोप्यानें आणली व तिला सर्वांनीं पुष्टि दिली. या बिल्ल्यांनीं विभूषित होऊन आम्हाला कोठेंहि जाण्यास अवसर मिळाला असता. स्टेशनावर प्लॅटफॉर्म तिकिटाशिवाय घुसून प्रतिनिधीसारख्या दिसणाऱ्या पाहुण्यांचें स्वागत करून त्यांचे बोजे उचलून बाहेरच्या छकड्यांतून ठेवणें हें पहिलें कार्य होतें. सर्व वाहनांना भाड्यांसाठीं कॉंग्रेस कमिटींत जाण्याविषयीं सांगण्याचें ठरलें; मात्र वाहनांचें भाडें प्रतिनिधींकडून आम्हीं स्वतः वसूल करण्यास हरकत ठेवली नव्हती. त्याचप्रमाणें हारतुरे वगैरे माल बुधवारांतल्या फुलवाल्यांकडून कॉंग्रेसच्या नांवावर उधार घेऊन वापरण्याचाही ठराव मेळ्यानें ताबडतोब पसार केला.

यानंतर मिरवणुकीच्या प्रश्नास तोंड फोडण्यांत आलें. वादविवाद बराच झाला. नामू म्हणाला, कीं कलकत्त्याच्या कॉंग्रेसच्या वेळीं पंडित मोतीलालजींना चाळीस पांढऱ्या घोड्यांच्या रुपेरी गाडींतून नेण्यांत आलें तसें कांहींतरी करावें. गणू म्हणाला, कीं अध्यक्षांवर सगळयांचा डोळा असतो, आपण आपले चिल्हर देशभक्तांनाच मिरवूं. शंखू म्हणाला कीं, पांढरे घोडे नाहींत; पण टांग्यांचीं घोडीं आहेत त्यांच्याच पाठीवर धोब्याकडून आणून पासोड्या पांघराव्या, म्हणजे खादी प्रदर्शनही होईल व घोड्यांच्या पाठीवरचीं क्षतेंही झांकलीं जातील. गणूनें सुचविलें, कीं अशी सगळीं घोडीं मिळून बालाजीच्या रथाला जोडायला हरकत नाहीं. रथांत मात्र अध्यक्षांच्या बदली एखादा वजनदार ‘दे. भ.’ बसवावा. हरीनें विचारलें, कीं मग रिकाम्या टांग्यांचे काय करायचें ? त्याच्यावर खंडू म्हणाला, कीं त्यांतून किरकोळ देशभक्तांना बसवून लोकांनीं ते टांगे ओढावें. गोप्यानें शंका काढली, कीं दे. भ. पुढें बसणार कीं मागें ? कारण नेहमींप्रमाणें मागें बसले तर लोकांचे हार पुढच्या टांगेवाल्याच्याच गळयांत पडतील. खंडू म्हणाला, हरकत नाहीं, टांगेवाले तरी खूष होतील, त्या बिचाऱ्यांचा तरी कधीं सन्मान व्हायचा आहे ?

या नंतर '—की जय !' कोणाकोणाच्या नांवानें पुकारायचा हा प्रश्न निघाला. शिवाजी महाराज—टिळक—गांधींपासून वस्ताद गुलाम दस्त-गीरांपर्यंत तीस नांवांची यादी ताबडतोब तयार झाली. पण नामू म्हणाला, कीं या पर्वणीला आपल्या ओळखीच्या कांहीं लोकांना 'चान्स' द्यावा. तेव्हां भराभर काळे मास्तर, गंग्या हलवाई, चिरागदिन दारूवाला आण्णा भटजी वगैरे नांवें सुचविण्यांत आलीं. शेवटीं तडजोड झाली, कीं ज्यानें त्यानें आपल्याला हवें तें नांव हळू उच्चारून—'की जय' मोठ्यानें ओरडावें म्हणजे झालें. यानंतर मिरवणुकीच्या मार्गांतील पताकांवरून लिहिण्याच्या उद्‌बोधक वाक्यांविषयीं चर्चा झाली. हरीची या बाब-तींत एक नवीन टूम होती. तो म्हणाला, 'स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्क आहे' वगैरे ठराविक वाक्यांचे पडदे लावण्यापेक्षां स्वदेशी माल वापर-ण्यास उत्तेजनार्थ म्हणून गांवांतील व्यापाऱ्यांच्या जाहिराती पैसे घेऊन फडकवाव्या. उदाहरणार्थ 'पंपूशेटचाच अस्सल स्वदेशी काबुली हिंग वापरा' किंवा 'देशासाठीं खरे पैदास मोती घ्या' अशा जाहिराती आजसुद्धां आपल्याला मिळत आहेत. हरीचा हा महत्त्वाचा मुद्दा सर्वांनीं मान्य केला. प्रतिनिधींच्या जेवण्या—रहाण्याच्या सोयीबद्दल गणूनें खुलासा केला, कीं ती सर्व व्यवस्था माझ्या हातांत आहे. ठकूबाईची खानावळ, 'पुंडे आश्रम' व 'विलायती—विहार' यांच्याशीं डझनाचे भाव मिळण्याची व्यवस्था मी केव्हांही करून देईन. शिवाय, रहाण्यासाठीं आपल्या मित्र-मंडळींच्या घरांतून माणशीं दीड रुपया रोज पाहुण्यांकडून मिळवून देण्याचाही मक्ता मी घेतों.

कॉंग्रेसचें अधिवेशन सुरू झाल्यावर आठ दिवस गांवांतलीं सगळीं वाहनें आपल्या ताब्यांत आडवून ( Corner करून ) आपण सांगूं ते दर सुरू करण्याचा महत्त्वाकांक्षी बेत मी पुढें केला. पण टांगे—गाडी—मोटार-वाल्याकडून कमिशन घेऊन त्यांना गिऱ्हाईकी मिळवून देणें कमी त्रासाचें व म्हणून जास्त ग्राह्य असें खेळमेळेकऱ्यांचें मत पडलें. तिकिटें विकण्या-विषयीं असें ठरलें, कीं नेहमींप्रमाणें प्रतिनिधी व प्रेक्षक यांच्यासाठीं स्वस्त दराचीं स्वतंत्र तिकीटें छापून सायकलस्वारांनीं तीं गल्लोगल्लीं विकावीं व

सांपडले जाण्याची भीति वाटल्यास तिकिटें ड्रेनेजच्या 'म्यान होलां'त टाकून चिंचवडला पसार होण्याच्या तयारीनें एक लॉरी कायमची सज्ज ठेवावी.

राष्ट्रीय सभेच्या बैठकींत उत्तेजनार्थ व निषेधार्थ काय व्यवस्था असावी, हा विषय आतां आमच्यापुढें आला. नामू म्हणाला, कीं आमच्या तिकिटांनीं आंत सोडलेल्या प्रतिनिधींच्या व प्रेक्षकांच्या टोळ्या मंडपांत सर्व बाजूंना बसवून योग्य त्यावेळीं टाळ्या व जरूर त्यावेळीं शिट्या, हंशा व 'हुशहुश' असे आवाज पद्धतशीर काढविण्यास आपल्यातर्फे प्रत्येक टोळीवर मुकादम नेमावेत. याला पुष्टी देतांना गणू म्हणाला, कीं हेच मुकादम पाणी, पानपट्या, फुटाणे, पंखे वगैरे सुखसोयीचीं साधनें पुरविण्यासही उपयोगी पडतील. शिवाय, गरज पडल्यास कागदाचे बाण व बोळे, आपटबार व तपकिरीच्या पुड्या हीं शस्त्रास्त्रें वाटण्यास व सभा उधळूनच टाकायची असेल तर 'साप साप!' म्हणून हूल उठविण्यास या लोकांचा चांगला उपयोग होईल.

पोट-कमिट्यांच्या सोयी ही निव्वळ आपल्या स्वतःच्या करमणुकासाठीं बाब आहे, असें शंखूनें सांगितलें. त्यानें खुलासा असा केला, कीं या कमिट्या वाटेल त्या 'आड टाईमाला' जमतात. सदस्य नेहमींच एकमेकांना ओळखतात असें नाहीं. तेव्हां नवशिक्या पाहुणे-सदस्यांचे वाटाड्ये म्हणून त्यांच्याबरोबर हिंडून त्यांचा संबंध नसलेल्या कमिट्यांतून त्यांना नेऊन बसवलें तर मोठे बहारीचे प्रसंग येतील. उदाहरणार्थ, विषय-नियामक कमिटीवाल्याला प्रचार-कमिटींत किंवा मतदान-कमिटीकराला खादी-कमिटींत बसविणें. शंखूनें छातीठोकपणें सांगितलें, कीं पुष्कळदां अशा चुकलेल्या कोकरांच्या लक्षांतसुद्धां त्यांची चूक येणार नाहीं.

परप्रांतीय पाहुण्यांच्या स्थानिक संस्थांस भेटी, हें कॉंग्रेसच्या अधिवेशनाव्यतिरिक्त मुख्य कार्य होतें. त्याच्या सोईसाठीं पुण्यांतील सुप्रसिद्ध संस्थांच्या नांवाच्या पाट्या रंगवून घेऊन, वेगवेगळ्या मित्रांच्या घरावर त्या लावून तेथें परस्थ पाहुण्यांना आणणें, व त्यांच्या आगमनाच्या जोरावर उपहाराची व्यवस्था मक्तेदाराकडून उधार करविणें, ( बिलें परस्परच त्या संस्थांकडे पाठविण्यास सांगणें ) ही आमच्या कार्याची

रूपरेखा होती. प्रयोगाच्या सोईसाठीं मी दाजी कॉलेजचा प्रिन्सिपॉल, खंडू भारत–इतिहास–संशोधक मंडळाचा अध्यक्ष, नागू म्युनिसिपल प्रेसिडेंट, शंखू प्राच्यविद्या–संशोधन–मंदिराचा आचार्य वगैरे भूमिका मेळेकरांनीं वांटून घेण्याचें ठरविलें.

स्वदेशी प्रदर्शन व औद्योगिक बाजारांत गांवांतल्या व्यापाऱ्यांचा पडून राहिलेला माल, ओळखीच्या स्त्रियांचीं घरगुतीं कलाकुसरीचीं कामें व आमच्या सर्व दोस्तांकडील जुनें व पडीक सामान ठेवून खूप किंमत लावण्याचें आम्ही ठरविलें. प्रदर्शनांत ठेवण्याच्या मालाचें क्षेत्र इतकें विस्तृत व व्यापक केलें होतें, कीं गणूच्या पितामहांचा तेल दिलेला व पुस्ती लावलेला जुना जोडा, गोप्याच्या मथीनें विणलेला चौपन्नरंगी व तेरा फूट लांबीचा लोंकरी गळपट्टा, नाम्याच्या घरचें जुनें बांगड्याचें मखर व माझ्या ' बिनधोक वस्तऱ्या'चीं वापरलेलीं पातीं ह्या गोष्टींदेखील प्रदर्शितें ( Exhibits ) म्हणून मान्य करण्यांत आल्या.

कॉंग्रेसच्या सुप्रसंगीं गोळा करण्यासारखा खास फंड हरीनें सुचविला–' परस्परधर्मप्रेमवर्धक अखिल भारतीय हिंदु–इस्लाम फंड ' या भारदस्त नांवाखालीं हा फंड सुरू करायचा; त्यांतील तत्त्व हें, कीं मशिदी बांधण्यासाठीं हिंदूंच्या देणग्यांचा विनियोग व देवळें बांधण्यासाठीं मुसलमानांच्या वर्गणीची वासलात लावणें. हरी म्हणाला, कीं मुसलमान कांहीं देतील किंवा नाहीं ही शंकाच आहे; पण हिंदु लोकांबद्दल मला खात्री आहे. हिंदूंना बाटविण्यासाठीं जरी आपण फंड काढला तरी तो देणारे हिंदु धर्मात्मे सांपडतील. आम्ही या योजनेचें योग्य तें कौतुक केलें.

करमणूक या सदरांत पाहुण्यांना पुणें दाखविण्याच्या मुद्यावर भाषण करतांना गणू म्हणाला कीं, आपल्या गांवच्या गरीब टांगेवाल्यांना भाडें मिळण्याच्या उदात्त हेतूनें, आपल्या नेतृत्वाखालीं प्रेक्षणीय स्थळांच्या सफरी करण्याची ही योजना आहे. पर्वती, चतुःशृंगी, शिंद्याची छत्री, होळकराचा पूल, गायकवाड वाडा वगैरे इतिहासप्रसिद्ध ठिकाणें पाहुण्यांना दाखवून टांगेवाल्यांच्या उत्पन्नांतील रुपयाचा आणा आपल्या मेळ्याला

मिळविण्याची ही संधी आहे. गणूच्या घरांत २।३ टांगेवाले भाडेकरी भाडें थकवून राहिले होते हें लक्ष्यांत घेऊन आम्हीं या योजनेला रुकार दिला. नाटक किंवा मेळ्याचा कार्यक्रम केवळ पुण्याचें वैयक्तिक वैशिष्ट्य व्यक्त करण्यासाठीं होता. नाटक किंवा मेळ्याचा कोणता सार्वजनिक कार्यक्रम करमणुकीसाठीं होतो ? (गोप्यानें सवाल केला) तेव्हां एकाद्या होतकरू 'दे. भ.' कडून त्याच्या सत्कारसमारम्भासाठीं फी घेऊन, व एखाद्या बुडीत नाटक कंपनीकडून कमिशन घेऊन हा योग काँग्रेसच्या पर्वणीला घ्यावा. गोप्याचें तत्वज्ञान आम्हांला पटलें.

काव्यगायनाच्या ठरावावर बोलतांना खंडू (थोडें खांकरून) म्हणाला, कीं, काँग्रेस व काव्य-गायन यांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं हें मी कबूल करतों; पण मला असें कळलें आहे कीं, सरदार कवडीकर नांवाचा एक गर्भ—श्रीमंत कवि (!) पुरेसा श्रोतृवर्ग मिळवून देणाऱ्याला बक्षीस देण्यास तयार आहे. आपल्याला माहितच आहे, कीं काँग्रेसला आलेले प्रतिनिधी व प्रेक्षक दिवसभरच्या बैठकीनंतर संध्याकाळीं जरा गाफील असतात; अशा स्थितींत कांहीं तरी निमित्तानें त्यांना म्युनिसिपल कोंडवाड्यांत सोडून, बाहेरून कुलूप लावून सरदाराचें काव्यगायन करणें शक्य आहे. खेळमेळ्यानें या ठरावाला एकमतानें पसंती दर्शविली.

समारोप व निरोप या शेवटच्या बाबीवर भाषण करण्यास मी उभा राहिलों. मी सांगितलें, कीं वरील सर्व गोष्टी जर सुरळीत पार पडल्या तर सम किंवा विषम आरोप करण्यास आपले गांवकरीच तोंपर्यंत तयार होतील. तेव्हां काँग्रेसला निरोप देण्यास थांबण्याऐवजीं पुण्याचा निरोप आपण सर्वांनीं ( वर्गणी वांटून घेतल्यानंतर ) घ्यावा हा उत्तम मार्ग. मी कोंकणांत आपल्या गांवीं गुप्तपणें जाणार आहें. इतर मेळेकरी या मार्गावर फार खूष झाले. खंडू व शंखू यांनीं पायीं पृथ्वीप्रदक्षिणा ( मासिकांत गवगवा न करतां ) करण्याचा निश्चय जाहीर केला. गोप्या व गणू मुंबईंत जाऊन राहाण्याच्या गोष्टी बोलूं लागले. नामू म्हणाला, कीं म्हातारीला काशी—रामेश्वर करवून आणीन. हरी म्हणाला, कीं माझ्या एका मित्राच्या

ओळखीच्या डायरेक्टरला बाटल्यांचा खुराक सुरू करून मी सिनेमा कंपनींत नोकरी मिळवीन.

आम्ही सर्व आनन्दानें आपआपल्या घरीं गेलों.

*　　*　　*

पण मनुष्य ठरवतो आणि देव फिरवितों तशांतली गोष्ट. पुण्याची जादा कॉंग्रेसच रद्द झाली व आमच्या सर्वांच्या आशेचे मनोरे ढांसळून पडले!

———

# सज्जनांची सभा



## (ज्ञानप्रकाशात न आलेला अहवाल)

[ सज्जन व संत या शब्दांचे अर्थ जवळजवळ वाटल्यामुळें कोणाची प्रामाणिक समजूत होईल कीं एका हंगामांत पुण्यास उडालेल्या साई-लोकांच्या उरूसाचा—महाराष्ट्रीय सन्त परिषदेचा—हा 'रपोट' असावा; पण आश्वासन देण्यास आनंद होतो कीं तसें नाहीं. खालील सज्जनांचा सन्तांशीं काडीइतका—ऊदकाडीइतकासुद्धां—संबंध नाहीं. सज्जनाला संत (किंवा संताला सज्जन) म्हणणें म्हणजे जाणूनबुजून प्रकरण हातघाईवर ओढवून आणणें आहे, हें वेळींच ओळखून हा खुलासा केलेला बरा. आतां सज्जनांत एकादा 'संत' या आडनांवाचा इसम (संतांच्या कळपांत सांपडलेल्या 'सज्जन' नामक निरपराध मनुष्याइतकाच) अचानकपणें आढळणें शक्य आहे, पण त्याला अगदीं लांबून वळसा घालून पुढें जाणेंहि तितकेंच सोपें आहे. भालाकार भोपटकरांनीं एका बेछूट क्षणाला गायकवाड वाड्याला 'सज्जनवाडा' असें अविचारी नांव दिल्यापासून आजकाल कोणाला 'सज्जन' म्हणण्याची चोरी झाली आहे—एकाद्याला 'संभावीत' म्हटल्यास तो जसा संशयखोरपणानें चपापून बघतो तशीच प्रतिक्रिया 'सज्जन' या संबोधनानें होईल कीं काय, अशी धास्ती वाटते. तथापि यापुढें हा शब्द कोणत्याहि दुष्ट अर्थानें वापरला नाहीं हा इशारा (सज्जनांच्या भीतीनें) अगाऊच दिला जात आहे. मरहूम महाराणी विक्तोरिया यांच्या कारकीर्दित डेक्कन वर्नाक्युलर टेक्स्ट बुक रिविजन कमिटीनें शाळांत लैब्रऱ्यांसाठीं व प्रैजबुक म्हणून मंजूर केलेल्या 'सज्जन तो सज्जन' या सोज्वळ व बोधप्रद ग्रंथांत ज्या प्रामाणिक अर्थानें हा शब्द वापरला असेल त्याच अर्थानें तो येथें घ्यावा, अशी वाचकांस सविनय प्रार्थना आहे. ]

सज्जन–सभा या कल्पनेचें सर्व श्रेय श्री. गो. गो. अधिकारी यांना द्यायला हवें. दोन तीन वर्षांपूर्वीच्या प्लेगांत अधिकारीमजकुरांनीं पुणें शहर सोडल्यापासून त्यांना आपल्या स्तुत्य उपक्रमांना फुरसत मिळत नव्हती. पण आनंदाची गोष्ट अशी कीं प्रकाशनक्षेत्रांत अनेक प्रकारचे दिग्विजय मिळवून–अखेर अटकेपर्यंत नाहीं तरी निदान कराचीपर्यंत तरी–मराठी प्रकाशनाचे झेंडे लावून श्री. गो. गो. अधिकारी यशस्वी रीतीनें पुण्यनगरीस परतले. ( दरम्यानच्या त्यांच्या हालचाली वेळोवेळीं ‘ ज्ञानप्रकाशच्या ’च्या स्तंभांत बिनचूकपणें नमूद झाल्याच आहेत. ) आपल्या मुलुखगिरीची जणू काय लूटच म्हणून त्यांनीं ( थोडाथोडका नव्हे, तर ) पन्नास हजार रुपये किंमतीचा आपला अमूल्य ग्रंथसंग्रह महाराष्ट्राला अर्पण करण्याची तयारी जाहीर केली. ( या ठिकाणीं वाचकांनीं मिष्किलपणें स्मित करणें अगदीं गैरवाजवी आहे–कोणाला शंका असल्यास त्यानें जाऊन पुस्तकांच्या किंमतींना प्रतींच्या संख्येनें गुणून आपली खात्री करून ग्यावी. ) या भरीव साहित्यसेवेला योग्य स्थान–किंवा–गुदाम मिळेपर्यंत श्री. अधिकारी आपल्या पूर्वीसारख्या उपक्रमांसाठीं मोकळे राहिलेच होतें; लौकरच त्यांच्या तल्लख बुद्धीला चालना मिळून त्यांनीं सज्जन-सभेची क्लृप्ति काढली. त्यांच्या कल्पनेला मूर्त स्वरूप येण्यास वेळ लागला नाहीं; व सज्जन–सभेचा सुयोग सुविजयादशमीला सुमारें सत्तर सूज्ञांच्या सहकार्यानें सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत घडून आला. या गोड समारम्भाची सुसंगत व तपशीलवार हकीगत खालीं देण्यांत येत आहे.

* * *

ज्ञानप्रकाशांत आगाऊ वेळोवेळीं छापलेल्या विनंतीपत्रांप्रमाणें व माहितीपत्रांअन्वयें सज्जनसभेच्या रूपरेखेला भरपूर प्रसिद्धि देण्यांत आलीच होती. महाराष्ट्रांतील प्रातिनिधिक बहुमतानें ‘ ज्ञानप्रकाश ’चे सुविद्य सुविचारी व सूज्ञ संपादक श्री. कृ. ग. ऊर्फ काकासाहेब लिमये यांना या सभेचे अध्यक्ष निवडण्यांत आलें. ( पहिल्या व दुसऱ्या वाक्याचा यत्किञ्चितही कार्यकारणसंबंध नाहीं हें शंकेखोरांसाठीं येथें नमूद करणें प्राप्त आहे. ) वेगवेगळ्या केन्द्रांच्या प्रतिनिधी सज्जनांसाठीं दहा रुपयांचें तिकीट

ठेवण्यांत आलें असून प्रेक्षकांसाठीं पंचवीस रुपयांचें तिकीट होतें. प्रेक्षकांच्या तिकिटाची किंमत जास्त ठेवण्याचें कारण एक तर टवाळ लोकांना दूर ठेवणें व दुसरें, सज्जन लोकांचा असा एकजात 'लाट' कलियुगांत सहज पाहण्यास मिळत नसल्यामुळें अशा अमृतसिद्धि योगाचा फायदा घेणारां-कडून योग्य ती फी वसूल करणें. सज्जनसभेचे प्रतिनिधी प्रादेशिक तत्त्वावर न बोलावतां विविध संस्थांच्यातर्फे निवडून मागविण्यांत आले होते. त्या-प्रमाणें खालील सत्सदस्य उपस्थित झाले:—

धंदेवाईक सज्जन व कॉंग्रेस यांचेतर्फे—महात्मा गांधीकडून—मूक संदेश, एक कापसाचा पेळू व शेळी.

मुंबई सरकारकडून—ना. खेर यांची दहा रु. ची मनीऑर्डर व सदिच्छेची तार.

संस्थानिकांतर्फें—भोरचे व औंधचे चीफसाहेब.

लोकशाही स्व. पक्षाचे—श्री. आ. रा. भट व रा. वा. कृ. भावे

सत्यसमाजाचे प्रतिनिधी—रा. ब. नवले व श्री. ग्यानू कोंडू पाटोळे

लोकमान्य भोजन संघाकडून—श्री. भा. ब. भोपटकर

झारापकर्स टेलरिंग कॉलेजचे—श्री. नामदेव शिंपी.

पूना गेस्टहौसतर्फें—श्री. भाऊराव सरपोतदार.

'दीनबंधू'च्या वतीनें—महर्षि अण्णा नवले.

सहकारी चळवळ परिषदेचे—खंडूभाई शहा व ना. भा. केळकर.

याशिवाय मोशन पिक्चर सोसायटीचे श्री. हिर्लेकर, बोलपटकलेतर्फें बाबुराव हें पहिलें नांव असलेले तीनचार इसम, प्रतिवादी भयंकर मठाचे दोन छाटीवाले (व दिगंबर जैनांकडून दोन बिनछाटीवाले), तसेंच सुप्रसिद्ध नार्मद—शालिग्राम संशोधक व वेश्यापरिषदेचे अध्वर्यु असोद्याचे काळे, ज्योत्स्ना—संपादकांतर्फें वि. ह. कुलकर्णी व वा. रा. ढवळे, साहित्यसंघाचे दोन तीन पुरोगामी आदमी, ऊर्ध्वगामी वाङ्मय मंडळाचे एकदोन लोक, मुंबई ब्राह्मण सभेचे श्री. काणे व गजेन्द्रगडकर, ठाणें मराठी ग्रंथालया-तर्फें रा. सा. चाफेकर व रा. सा. भागवत, झब्बूशाही विध्वंसक—झुणका-

भाकरीच्या तिकिटावर वसंतराव मराठे व डॉ. भालेराव इत्यादि अठरापगड सज्जन समारंभास प्रतिनिधी म्हणून आले होते. त्याचप्रमाणें महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यांतील बारीकसारीक संस्थातर्फे सातआठ कुलकर्णी, पांचसात जोशी, पंधरावीस देशपांडे व किरकोळ गोखले, साठे, पाध्ये, कर्वे, भिडे, मोघे, पंडित, दीक्षित वगैरे मंडळी आलेली होती.

याखेरीज साहित्यसम्राट श्री. न. चिं. ऊर्फ तात्यासाहेब केळकर, नटसम्राट श्री. नारायणराव राजहंस ऊर्फ बालगंधर्व, कविसम्राट आयत्या-वेळीं मिळाले ते विनोदसम्राट श्री. प्र. के. ऊर्फ बाबुरावसाहेब अत्रे, उपन्याससम्राट श्री. वि. स. ऊर्फ भाऊसाहेब खांडेकर इत्यादि सुमारें दीड-डझन लहानमोठे सम्राट या महत्त्वाच्या प्रसंगीं उपस्थित होते. श्री. काकासाहेब लिमयांच्या प्रेमळ उत्तेजनाखालीं गरजणाऱ्या, गुरगुरणाऱ्या व केंकाटणाऱ्या मुंबईपासून कोल्हापूरापर्यंतच्या बारीकसारीक प्राण्यांचा एक छोटा पांजरपोळ होता तो वेगळाच. विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे गोरक्षण संस्थेतर्फे श्री. धेनुदास डोळे यांच्या देखरेखीखालीं एक सात्त्विक कालवडही सज्जनसभेला आली होती. (दिल्ली सरकारकडून सहानुभूतिदाखल पाठविण्यांत आलेली एक उमदी बैल जोडी या काल-वडीच्या जवळपासच बांधली गेल्यानें समारम्भात साठमारीचा मोफत कार्यक्रम होण्याची वेळ आली होती; पण पांजरपोळ विभागांतल्या मुंबईच्या एका प्रतिनिधीनें प्रसंगावधान ठेवून, गरजून साद देतांच हंबरड्याचे पडसाद उठून एक गरीब बिचारी 'गोगल' गाय त्याच्या मदतीस धांवून आली व मध्यवर्ति सरकारच्या प्रतिनिधींची समजूत घातली जाऊन सभेंत शांतता प्रस्थापित झाली.)

* * *

प्रतिनिधींखेरीज या सुप्रसंगीं उपस्थित असलेल्या पाहुणेमंडळींत प्रामुख्यानें श्रीमंत व. चु. मं. स. सौ. राणीसाहेब इचलकरंजी, सरदार्स विंचूरकर, हेब्बळीकर, रास्ते, नातु, पदमजी, दस्तुर, मुदलियार, रा. ब. चिनमुळगुंद, श्री. बापूसाहेब जठार, सी. आय. ई., बॅ. गाडगीळ, सौ. कमलाबाई गांधी, डॉ. नायडू, कंत्राटदार केंजळे, करळे व करपे, शेठ

हणमंतराम रामनाथ, श्री. बाबासाहेब देशपांडे इ० मंडळी ( या सर्व नांवांचा ब्लॉक ज्ञानप्रकाश ऑफिसांत वेळेला न मिळाल्यामुळें ज्यांचीं नांवें छापलीं गेलीं नाहींत त्यांनीं माफी करावी. त्यांचीं पुरवणी यादी पुढील अंकांत छापण्यांत येईल असें आश्वासन श्री. गो. गो. अधिकारी यांनीं दिलें आहे. ) दिसून येत होती. हजर असलेल्या मंडळींखेरीज शुभ-संदेश (तारा व गैरहजेरीबद्दल दिलगिऱ्या), अनेक संस्थांकडून व व्यक्तींकडून आलेले श्री. अधिकारी यांनीं सभेच्या सुरुवातीस वाचून दाखविले. त्यांत विशेष महत्वाचे म्हणजे दे. भ. तात्याराव सावरकर, अल्ली-बहादुरखान, दे. भ. नारायणराव गुंजाळ, भाई परमानंद, बॅ. जीना, दे. भ. बी. एफ्. भरूचा, श्री. विश्वासराव डावरे, श्री. शंकरराव लवाटे, श्री. वा. वि. साठे, श्री. आप्पा गोखले, डॉ. स. बा. हुदलीकर, श्री. द. ना. हेजीब, श्री. रंगोबा लडकत वगैरे व्यक्तींचे व संस्थानी प्रजापरिषद, मुळशी सत्याग्रहसमिती, पैसाफंड मेळा, भारत इतिहास संशोधक मंडळ, महाराष्ट्रीय मंडळ, सरदारगृह, नागरिक स्वातंत्र्यसंघ, आरोग्यमंडळ, १९५० चे पुणें, संस्कृति संरक्षक मंडळ, राइट एजन्सी, गूढविद्या-चिकित्सकसंघ, जादूगारमंडळ, सुवर्णमध्यसमिति इ० संस्थांचें होते.

* * *

गुरुवार ता. १४ ऑक्टोबर १९३७ हा दिवस ज्ञानप्रकाशचा त्या दिवशीचा अंक सुवर्णाक्षरांनीं छापण्यासारखा झाला कारण ( एकतर तो दसऱ्याचा दिवस होता हें खरेंच, पण शिवाय ) त्या सन्मान्य वृत्तपत्राचे सुस्वभावी व अजातशत्रू संपादक श्री. कृ. ग. ऊर्फ काकासाहेब लिमये यांच्या निरुपद्रवी तपस्येची फलश्रुति त्या दिवशीं होत होती. सज्जनांची सभा पुण्यांत ( विश्वास ठेवा वा ठेवूं नका ) त्या दिवशीं भरली होती. गो. गो. अधिकारी या निरलस कार्यकर्त्यानें आपल्याला मिळालेल्या अखंड पुरस्काराबद्दलची कृतज्ञता त्या दिवशीं व्यक्त करण्याची संधि साधली होती असें कोणी म्हणणारे म्हणोत, पण एवढें मात्र खरें कीं, ती सज्जनांची सभा श्री. काकासाहेब लिमयांच्या सत्कार समारंभांत रूपांतर पावली. या शेवटच्या घटकेला झालेल्या परिवर्तनाला एक तात्कालिक कारणहि घडलें.

सभागृहांत आयत्यावेळीं उपस्थित झालेले श्री. तात्यासाहेब केळकर संवयीप्रमाणें थेट व्यासपीठावरील अध्यक्षांच्या खुर्चीवर जाऊन स्थानापन्न झाले ! त्यामुळें सभेच्या अधिपतीची रीतसर निवड ( व त्यासाठीं दोन-तीन विद्वानांनीं घटवून ठेवलेलीं आपलीं भाषणें ) जागच्या जागींच राहिलीं. पण गो. गो. अधिकारी डगमगले नाहींत, त्या प्रत्युत्पन्नमति सद्‌गृहस्थानें आपल्या भाषणाचें तंत्र ताबडतोब बदललें; अध्यक्षपदासाठीं श्री. काकासाहेब यांचें नांव सुचविणारें भाषण त्यांनीं लिहून आणलेंच होतें तें हां हां म्हणतां त्यांनीं मानपत्राच्या रूपानें वाचलें व शेवटीं करंडकाचे अभावीं हातीं लागलेल्या शेजाऱ्याच्या एका टोपींत तें गुंडाळून श्री. काकासाहेबांच्या डोक्याला त्याचा स्पर्श केला व याप्रमाणें त्या महाभागाला ‘ सभेचे मूर्धाभिषिक्त सज्जन ’ म्हणून जाहीर करून टाळयांच्या कडकडाटांत ते खालीं बसले. ( एव्हांना “ काकासाहेब–लिमये–सत्कार–निधी ”ची संपूर्ण रूपरेखा त्यांच्या डोक्यांत सुचून तयारही झाली होती. )

* * *

श्री. अधिकारी यांनीं वाचलेलें मानपत्र खालीलप्रमाणें होतें:—

श्री. रा. रा. कृष्णाजी गणेश ऊर्फ काकासाहेब लिमये, एम्., ए. एल्एल्. बी. संपादक “ ज्ञानप्रकाश ”, पुणें;

परमपूज्य काकासाहेब,

आजच्या मंगलप्रसंगीं येथें जमलेल्या सज्जनांतर्फें आपलें हार्दिक स्वागत नी अभिनंदन करतांना मला अत्यानंद होत आहे. या सभेला साहित्य–सम्राट श्री. तात्यासाहेब केळकर यांच्यासारखे थोर अध्यक्ष लाभल्यामुळें हा जणुं मणिकांचनयोगच आला आहे. त्यांच्या सन्मान्य अध्यक्षतेखालीं व येथें जमलेल्या श्रेष्ठ विभूतींच्या सहानभूतिपर प्रेरणेनें आम्हा सर्वांना आपणाविषयीं वाटणारा आदर व्यक्त करून दाखविण्याची संधी मजसारख्या एकाद्या प्रकाशकाला मिळावी, हा मोठा अपूर्व योगच होय यांत शंका नाहीं. संपादकांना प्रकाशकानें मान देणें ही अद्‌भुत गोष्ट पूर्वीं एकदांच घडली होती–ज्यावेळीं यंदेशेटजींनी श्री. तात्यासाहेबांचा सत्कार केला होता तेव्हां; पण मजसारख्या स्वतःच्या मालकीचा छापखाना

नसलेल्या प्रकाशकाला हा मोका साधतां यावा याबद्दल मला विलक्षण अभिमान वाटत आहे. (गोष्टच निघाली म्हणून निर्देश करण्यास हरकत नाहीं कीं स्वतःचा छापखाना नसला तरी आज पन्नास हजार रुपये किंमतीचा ग्रंथसंग्रह मी महाराष्ट्रास अर्पण करूं शकतों. फक्त तो ठेवण्यास जागा पाहिजे.)

काकासाहेब, आपल्या संपादकीय कारकीर्दीचा उज्वल इतिहास महाराष्ट्रापुढें आहेच. तथापि पुनरुक्तीचें धाडस करूनही मीं त्याचा आढावा येथें थोडक्यांत घेण्याची परवानगी घेतों. सुमारें दहा वर्षांपूर्वीं किबेवाडा भस्मसात् होऊन भारतसेवक समाजाच्या पुण्याईनें शहराबाहेर यंत्रसामुग्रीनें परिपूर्ण अशा भव्य इमारतींत ज्ञानप्रकाशचें पुनरुज्जीवन झालें. या अग्निदिव्यांतून पार पडलेल्या आपल्या वृत्तपत्रांतही तेव्हां बराचसा फरक दिसून आला. एकेकाळीं किरकोळ शिरकोळ सरकारी नोकर, रावसाहेब रावबहादुर, जाहिरात देणाऱ्या कोर्टांचे कारकून, व प्रूफ रीडर, इतकाच वाचकवर्ग असलेला ज्ञानप्रकाश एकाएकीं स्पष्ट छापलेला दिसूं लागला. त्यांत जाड टैपाच्या शीर्षावल्या व कॉंग्रेस चळवळीच्या धाडसी बातम्या येऊं लागल्या ! दयाळू माबापसरकारची तारीफ बरीच कमी झालेली दृष्टोत्पत्तीस आली. गोरक्षण—प्रचारासाठीं घसा फोडीत हिंडणाऱ्या स्वयंसेवकांबरोबर निमूटपणें जाणाऱ्या गरीब गाईनें चिडून एकाएकीं त्यालाच हुंदाडून शिंगावर घ्यावें असाच कांहींसा चमत्कार दिसून आला ! भेदरलेल्या सरकारी नोकरांनीं (व पेन्शनरांनीं) पूर्वींच्या केसरीप्रमाणेंच हा नवा ज्ञानप्रकाशही सौभाग्यवतींच्या पत्त्यावर मागविण्यास सुरुवात केली. आपलें वर्तमानपत्र जें पूर्वीं केवळ पोष्टानेंच खपत असे तें आतां प्रत्यक्ष रस्त्यावर विकलें जाऊन लागलें ! नेमस्तांनाही भावना आहेत कीं काय असा दाट संशय लोकांना येऊं लागला. ज्ञानप्रकाशांत सत्याग्रहाच्या बातम्या पाहून उद्यां रावबहादूर लोकदेखील 'इन्किलाब झिंदाबाद !' अशा घोषणा लाल बावटे फडकावीत करणार, अशी धास्ती वाटूं लागली, आणि अखेर नेमस्त राजकारणाच्या प्रक्षुब्धतेचा कळस म्हणून कीं काय 'सायमन रिपोर्टांत टीका करण्यास बऱ्याच जागा आहेत !' अशी भयं-

कर धैर्याची रणगर्जना कै. गोपाळ कृष्ण देवधरांच्या उद्गाररूपानें आपल्या खवळलेल्या वृत्तपत्रांत एके दिवशीं छापून आली !

पण काकासाहेब, तीस सालच्या या परिवर्तनापेक्षांही, त्या चळवळीपासून सुरूं झालेल्या अस्वस्थ वातावरणांतून आपण हळूं हळूं नेमस्त राजकारणाच्या बंदिस्त दिवाणखान्यांत ज्या खुबीनें परतलांत, त्याची तारीफ करावी तितकी थोडीच वाटते ! ना. शास्त्री, कुंझरू, चिंतामणी, हे बर्फाचे पुतळे वितळले तेव्हां आपणही सात्विक संतापानें कोमट झालांत, आणि वेळोवेळीं त्यांच्या सावधगिरीच्या राष्ट्रीयतेनें आपणही आपलें उष्णतामान आवरून धरलेंत. भारत सेवक समाजाशीं इमान ठेवून त्याबरोबरच बातम्या वाचणाऱ्या लोकांनाही खूष ठेवण्याची आपली ही मुत्सद्देगिरी कोण दुसरा दाखवूं शकेल ? मदांध अधिकाऱ्यांच्या अत्याचारांचे अहवाल देतां देतां सरकारला ' प्रेमाच्या सूचना ' करण्याची कला आपल्याशिवाय कोणाच्या अंगीं आढळेल ? रयतेवरच्या जुलमांची हकीकत छापून त्याच दमांत सनदशीर राजकारणाचा पुरस्कार करणारा महात्मा मराठी भाषेंत आपल्याखेरीज दुसरा कोण ?

आणि जें धोरण राजकारणांत तेंच सामाजिक बाबतींत व महाराष्ट्रीय घडामोडींत आपण ठेवलेंत. राजकारणेतर गोष्टींत आपण पक्षातीत आहांत; आपण दोन्ही बाजूंचे मित्र, आपल्याजवळ डावें—उजवें नाहीं. ' रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति ' हा आपला महामंत्र आहे. शान्तता, समाधान व खेळीमेळी राहवी, कोणाला दुखवूं नये, सर्वांना चांगलें म्हणावें, आपल्या पत्राचें मैदान वाटेल त्याला खुलें ठेवावें, हें कमालीचें धूर्तपणाचें—व अर्थात् सौजन्याचें—धोरण आपण ठेवलें आहे, मग आपल्याला छुपा महात्मा कां म्हणूं नये ? हिटलेर—मुसोलिनीपासून बुटलेर—महाराणीपर्यंत सर्वांच्या कागाळ्यांना आपल्याकडे जागा आहे. व्ही. व्ही. गिरी असो वा गो. गो. अधिकारी—दोघांनाही आपल्या स्तंभांत स्थान आहे, जज्ज बेन लिंडसेपासून शं. दा. पेंडसेपर्यंत सर्वांचें वक्तव्य छापण्यास आपण तयार आहांत. यापेक्षां निःपक्षपातीपणा तो कोणता ? इंपीरिअल सिटिझनशिप असोसिएशनची बातमी आपण जितक्या ममतेनें छापतां तितक्याच प्रेमानें

साम्राज्यशाही विरोधक संघाची माहिती देतां, आमान–सभेइतक्याच हौसेनें आपण नागरिक स्वातंत्र्यसंघाकडे पाहतां, रोटरी क्लबइतकीच जागा लढाऊ कामगार संघाला देण्याची आपली तयारी आहे! सर सिद्दाप्पा तोटाप्पा कंबळी, बॅ. जमनादास मेहता किंवा मुरारजी देसाई या तिघांकडे सारख्याच निवलेल्या डोळ्यांनीं पहाणारा महानुभाव या कलियुगांत आपल्याखेरीज कोण निघेल? महात्मा गांधींच्या उपवासाइतकाच मजकूर देशदास रानड्यांच्या अन्नसत्याग्रहाला देण्याइतकें थोर मन आपल्यावांचून कोण दाखवूं शकणार आहे? रोम–बर्लिन इतक्याच आदरानें हातकणंगलें व गडहिंग्लज या महत्त्वाच्या शहरांच्या दिलेल्या बातम्या आपल्याच कृपेनें आम्हांला मिळतात. सहकारी चळवळीइतकींच पानें दुखवट्याच्या सभांना महिनेच्या महिने देण्याचें अनुपम औदार्य दुसरा कोण संपादक दाखवूं शकेल? सांगलीचे बाजारभाव असोत किंवा कणकवलीच्या शाळेचा बक्षिस–समारंभ असो, अशा सर्व प्रकारच्या राष्ट्रबलसंवर्धक बातम्यांनीं आपण देशाची जी अहर्निश सेवा चालविली आहे त्याबद्दल आपल्याला द्यावेत तेवढे धन्यवाद थोडेच होतील.

सार्वजनिक खुबीच्या आपल्या धोरणानें आपल्याला 'वार्तामधुव्रत' ही पदवी देण्याचा मला अनिवार मोह होत आहे (कृपा करून 'वहाँ' बोलपटाची आठवण आणून गैरसमज करून घेऊं नये.) आपल्या 'बिनबाजू' ध्येयामुळें महाराष्ट्र ललितकलासृष्टींतील अनेक महत्त्वाच्या प्रश्नांचा खल आपल्या मध्यस्थीनें घडून आला आहे. 'प्रतिभा–साधन' वाद गाजवून, आपण प्रो. फडक्यांपासून भोरच्या भालचन्द्रपंत कुलकर्ण्यांपर्यंत सर्व विद्वानांवर प्रकाश पाडलांत, श्री. अत्र्यांना 'चोरावर मोर' करून माझ्यासारख्या होतकरू प्रासिद्धिकाची पांच वर्षांची जाहिरात करण्यास उपयोगी पडलांत (हे आपले उपकार मीं कसें विसरेन?) 'मोडक–गवशे वाद'–कीं जो कोर्टांत जाऊन प्रत्यक्ष पाणिनीला साक्षीसाठीं स्वर्गांतून उतरण्याची वेळ आणण्यास कारण झाला–तो आपल्याच स्तंभांतून प्रथम प्रादुर्भूत झाला. शुद्धलेखन, छंदोरचना, व्युत्पत्तिशास्त्र इत्यादि छाती दडपून टाकणाऱ्या विषयांनीं आपल्याच पत्रांतून डोकावून कित्येक भावी वाचकांवर कायमची छाप ठेवून दिली. सरतेशेवटीं आपल्या कुशल वार्ताहरांकरवीं प्रि. प्र. के.

(उर्फ बाबूसाहेब) अत्रे, बी.ए.बी.टी., टी.डी.(लंडन) प्रिन्सिपाल कँप एज्युकेशन सोसायटीज स्कूल्स् व आगरकर हायस्कूल या माझ्या जिवलग दोस्तांचीं व्याख्यानें सविस्तर (व सटीप) छापून "महाराष्ट्राचे हास्याचार्य" या पदवीस नेऊन पोहोंचविण्यास आपला संपादित ज्ञानप्रकाश किती उपयोगी पडला हें मीं सांगायलाच पाहिजे असें नाहीं. आपल्या अनुकम्पाशील, सहिष्णु व सौजन्यपूर्ण पुरस्कारानें माझ्यासारखे प्रकाशक पुढें येतात इतकेंच नव्हे तर कित्येक परोपजीवी किरकोळ संपादकही निर्भयपणें हाता-तोंडाची गांठ घालीत संतोषानें आयुष्य कंठीत असतात. एकाद्या निश्चल तळ्यांत ज्याप्रमाणें कमळें उगवतात व कृमिकीटकही फोंफावतात त्याप्रमाणें आपल्या स्थितप्रज्ञ पत्रपांडित्यांत बरेवाईट, लहानथोर, सावचोर, सच्चे--तोतये असे सर्व प्रकारचे लोक भाव खाऊन राहून जातात. महाराज, 'रहा व राहूं द्या' या आपल्या तत्त्वज्ञानांत आपण आपल्या नेमस्त धोरणाचा, 'प्रागतिक' राजकारणाचा, उदारमतवादी ध्येयाचा व सोज्वल आत्मरंजनाचा परमोच्च बिंदु साधला आहेत, व त्याबद्दलच महाराष्ट्रांतील सर्वश्रेष्ठ (व सर्वांत व्यवहारचतुर) सज्जन या अभिधानानें आपल्याला गौरविण्यांत मी इतरांबरोबर कृतार्थ होत आहें."

* * *

श्री. गो. गो. अधिकाऱ्यांच्या या विद्वत्ताप्रचुर मानपत्रानें आजूबाजूचे कित्येक साहित्यिक हिरव्यापिवळ्या डोळ्यांनीं आपआपसांत कुजबुजूं लागले, तेव्हां त्या चाणाक्ष गृहस्थानें "अहो तुमच्यासारख्याच चार चौघांना विचारून लिहिलं झालं!" असं हांसत हांसत म्हणून सर्वांना खूष करून टाकलें. दरम्यान श्री. न. चिं. (ऊर्फ तात्यासाहेब) केळकर आपल्या अध्यक्षीय भाषणास उठले. प्रथम नेसूं वस्त्र नीट बसविण्याचा थोडा अभिनय करून व हलकेंच एक दुहेरी खाकरणी काढून त्यांनीं सुरवात केली:—

"आजच्या समारम्भाचा अध्यक्ष होण्यांत मी माझा मोठा गौरव झाला असें समजतों. काकासाहेबांचा व माझा ऋणानुबंध फार जुना आहे. एकेकाळीं आम्ही एकाच पेठेंत राहात होतों व 'जहाल कीं मवाळ' हा पक्ष ठरविण्याचे वेळीं ओलीसुकी करण्यास मी त्यांच्याजवळचाच पैसा घेतला

असावा असें मला अंधुक स्मरतें—कदाचित् असेल कदाचित् नसेल. आजच्या सज्जन सभेनें काकासाहेबांचा गौरव करावा हें अगदीं उचित आहे व त्या गौरवांत मीही आनंदानें सहभागी होत आहे. राजकीय मतभेद असला तरी एकमेकांच्या सामाजिक नात्यांत फरक पडण्याचें कांहीं कारण नाहीं (हा माझा कटाक्ष १९१९ पासूनच आहे) आणि आतां केसरी' आणि 'ज्ञानप्रकाश' यांत फरक विशेषसा राहिला आहे असेंही नाहीं—म्हटला तर आहे, म्हटला तर नाहीं. ज्ञानप्रकाशच्या ज्वलज्जहाल स्वरूपाबद्दल केसरीतर्फे मला थोडासा आदरच आहे व तो येथें व्यक्त करण्यास हरकत नाहीं."

* * *

यानंतर आभारप्रदर्शनासाठीं प्रो. श्री. नी. (उर्फ आण्णासाहेब) चाफेकर उठले.

"सज्जनवर्य अध्यक्षमहाराज, सुसज्जनश्रेष्ठ काकासाहेब, सर्वसज्जन नृपतिवृंद व शेषसज्जन—स्त्रीपुरुषसभासदहो, पूर्णचंद्राच्या शीतल व सुखकर कौमुदींत तारांगणाच्या साहाय्यक शोभेनें जो आल्हाद व्हावा, तो या सुजनसभेच्या अग्रस्थानीं असलेल्या श्री. काकासाहेबांच्या नेतृत्वाखालील अन्यसूज्ञसदस्यांच्या सहवासानें होत आहे. अशा वेळीं आपणा सर्वांचे, आपल्या वतीनें अध्यक्षांचे व श्री. काकासाहेबांचे आणि आभार श्री. ज्ञानोबारायांच्या चार शब्दांत मानून मी आपली परवानगी घेतो—

ऐक्यभावाची आंजुळि, सर्वेंद्रिय कुड्मळिं,
भरोनि पुण्यांजलि, अर्घ्य देऊं ॥ "

आभारप्रदर्शनास दुजोरा देण्यासाठीं प्रि. अत्रे उभे राहतांच सभागृहांत टाळ्यांचा कडकडाट झाला व ज्ञानप्रकाशचे खास 'अत्रे—वार्ताहर' श्री. म. य. (उर्फ दाजीसाहेब) दातार आपली पेन्सिल (आणि 'हंशा' व 'टाळ्या' या शब्दांचे रबर स्टॅम्प्स) सरसावून तयार राहिले. अत्रे बोलूं लागले.

"सज्जनहो ! (टाळ्या व हंशा) आपण उघड्या डोळ्यांनीं सज्जन म्हणून या सभेला आलों असतां या संबोधनानें दचकण्याचें कांहींच कारण

नाहीं. (प्रचंड हंशा) काल मंडईजवळ एक लठ्ठ गृहस्थ माझ्या गाडीला धक्का देऊन गेला (हंशा) व मला म्हणाला अहो 'शहाणे (टाळ्या) गाडी जरा बाजूनें हांका. (हंशा) तो मला ज्या अर्थानें शहाणे म्हणाला, तो मला भारतसेवक समाजाचे मो. ज्ञा. शहाणे समजून नव्हे (टाळ्या व हंशा) तर व्यंगार्थानें, पण तशा अर्थानें मी आपल्याला सज्जन म्हणत नाहीं (टाळ्या) कारण आपल्यांत मीही मोडतों (प्रचंड हंशा) काकासाहेबांचे व माझे संबंध फार जिव्हाळ्याचे आहेत व आज होणाऱ्या त्यांच्या बहुमानांत मला इतका साभिमान आनंद होत आहे कीं मारुतीला घातलेल्या रुईफुलांच्या मालेनें मारुतीमागच्या दगडी कमानीलासुद्धां तितका होत नसेल." (बेफाम हंशा व टाळ्यांचा प्रचंड कडकडाट.)

* * *

या हलकल्लोळांत बावरलेल्या भोर व औंध संस्थानांच्या चीफसाहेबां-कडून तेवढ्या गडबडींत गो. गो. अधिकाऱ्यांनीं "काकासाहेब–लिमये–सत्कार–निधी"साठीं प्रत्येकीं एक्कावन्न रुपयांचे आंकडे मिळविले. काका-साहेबांनीं अत्र्यांच्या भाषणानंतर उभे राहून सस्मित मुद्रेनें हात जोडून आपलें बिनशब्दांचें भाषण उरकून घेतलें, व त्यानंतर व्यासपीठावर चढून काकासाहेब–सत्कार–निधीची यादी श्री. अधिकारी वाचूं लागतांच सभागृह हळूं हळूं खालीं झालें. (सर्वांच्या पुढें काकासाहेब लिमये निसटले होते.)

———

# दिल्ली, आग्रा वगैरे



मी जर एखाद्या बारिकशा संस्थानाचा 'श्रीमंत नातलगसाहेब' किंवा एखादी होतकरू उत्तेजनीय लेखिका असतों तर प्रवासाच्या पूर्व-तयारीपासून सुरवात करून प्रवासाचें, ठिकठिणच्या पाहुणचारांचें, प्रेक्षणीय स्थलांचें व क्वचित् अन्य अनुभवांचें वर्णन करून कित्येक लेखांक 'पाडले' असते. पण दुर्दैवानें किंवा सुदैवानें मी सामान्य माणूस असल्यामुळें माझ्यावर तशी वजनदार जबाबदारी पडत नाहीं; तेव्हां पडलेल्या पायंड्याप्रमाणें प्रवासवर्णन न लिहितां अनपेक्षितपणें घडलेल्या यात्रेंत व्यक्तींचे, स्थलांचे व प्रसंगांचे जे अनुभव आले ते त्रुटितपणें लिहिणें मला भाग आहे. या प्रवासवर्णनांत नसलेलीं, ठिकठिकाणच्या प्रसिद्ध स्थलांचीं छायाचित्रें व शब्दचित्रें कोणत्याही योग्य मार्गदर्शिकेंत ( गाईड बुकांत ) सांपडतील.

१९२८ डिसेंबरमध्यें रात्रीं १०॥ वाजतां कॉलेज होस्टेलमध्यें मला भेटण्यास कोणी पाहुणे आल्याची वर्दी भय्यानें आणली. दुसऱ्या दिवशीं नाताळची सुट्टी होत होती व कोठें जावें हा माझा विचार चालला होता. आलेले पाहुणे माझ्या एका जवळच्या नातेवाईकांचे स्नेही होते; त्यांनीं सांगितलें कीं, कांहीं अनपेक्षित कारणामुळें माझ्या नातलग गृहस्थांना आपलें तिकिट वापरणें अशक्य आहे व स्वतःबदली मी तें तिकिट घेऊन प्रवासाला जावें असा त्यांचा निरोप आहे. तें तिकिट जी. आय. पी. नाताळ सफरीसाठीं निघणाऱ्या खास गाडीचें होतें.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं चार वाजतां गबाळ कोटपाटलोण घातलेली एक व्यक्ति स्वतःपेक्षांही गबाळ अशी ट्रंक-वळकटी घेऊन बोरीबंदरवर धांपा टाकीत दाखल झाली. शेवटच्या मिनिटाला आपला डबा शोधून काढून त्यांत सामान ढकलणारा हा मनुष्य दुसरा तिसरा कोणी नसून

लेखकच होता हें धूर्त वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. जी. आय. पी. रेल्वेच्या अनेक अंमलदारांच्या शुभाशिर्वादांत आमची गाडी चार वाजतां निघाली.

आमचा डबा मूळचा फर्स्टक्लास, पण म्हातारपणामुळें इभ्रत जाऊन बनलेला सेकंडक्लास होता. त्यांत माझ्याशिवाय माझ्या नातलगांचे तीन कानडी स्नेही व एक तेरा वर्षांचा मद्रासी मुलगा असे पांच प्रवासी होते. प्रत्येकाला एक स्वतंत्र 'बर्थ' होती व याच साडेतीन हातांच्या जागेंत आमचा प्रत्येकाचा संसार दहा दिवस राहायचा होता. आमच्या डब्याला हजारी स्नानगृहा( किंवा शॉवर बाथ )ची सोय होती. शिवाय दोन पंखे, प्रत्येक बर्थला वाचनाच्या सोयीसाठीं मागें दिवा व वर दोन झुंबरवजा दीपपुंज होते ते वेगळेच. जन्मामध्यें क्वचितच सेकंडक्लासमध्यें बसण्याचा प्रसंग आलेल्या माणसाला शोभेल असाच 'आ' करून आम्हीं वरील सर्व सुखसोयींची पाहणी केली. माझे तीन कानडी मित्र आपल्या शहराबाहेर सणावारींच पडणारे होते. त्यांतल्या दोघांना मराठी थोडथोडें येत होतें व एकाला इंग्रजीची अक्षरओळख होती. मद्रासी मुलगा मदुरा किंवा असल्याच कुठल्या तरी शहरच्या श्रीमंत सराफाचा होता, पण त्याच्यांत मद्राशाचा एकही गुणधर्म नव्हता. तो अगदीं अबोल, सौम्य व व्यवस्थित होता. इतक्या लहान वयांत जगाचा अनुभव यावा म्हणून बापानें त्याला एकट्याला इतक्या लांब पाठविलें होतें. नेहमीं बापासाठीं मद्रासेहून सोनें, चांदी आणायला आपण पुष्कळ खेपा करतों असें त्यानें आम्हांला सांगितलें! त्याचें आम्हांला फार कौतुक वाटलें—पण त्या कौतुकाचा फायदा घेऊन तो आमच्या गळ्यांत पडला नाहीं—खरोखरच त्याच्या अंगीं प्रांताभिनिवेश नव्हता.

आम्ही एकंदर एकशेंवीस प्रवासी होतों. 'समदं शेकिन् कलासाचं पाशिंजर.' यांत मुख्यत्त्वेंकरून पारशी व पारशिणी यांचा भरणा, त्याच्या खालोखाल बेळगांवीं हिंदु हौशी गृहस्थांचें एक टोळकें, आणि एक नव-इराणी ( पर्शियन ) जथा अशी मंडळी होती. बाकी अठरापगड जातींच्या माणसांत महाराष्ट्रीय या संकुचित व्याख्येंत बसतील (ज्यांना तात्या म्हणतां

येईल ) असे दोनच लोक होते. अहमदनगरचे एक विमा एजंट व दुसरा वाचकांचा नम्र सेवक. ते गृहस्थ उघडउघड 'तात्या' होते, पण मी आपली तात्यागिरी कोट–पाटलोणीनें झांकून फक्त अनपेक्षित प्रसंगीं दाखवित असे. गाडीला शाकाहारी व स्वाहाकारी ( व्हेजिटेरियन् व नॉन–व्हेजिटेरियन ) अशा लोकांसाठीं दोन वेगवेगळे डबे होते. जेवणाच्या वेळीं या डब्यांवर तुटून पडण्यांत इतरप्रांतीय लोक आम्हां मर्द मराठ्यांपेक्षां रेंसभरही मागें नसत.

गाडी नाशिक स्टेशनावर उतारूंना जेवणाच्या डब्याकडे जाऊं देण्यासाठीं उभी राहिली. गाडी वाटेल तेथें उभी राहायची व वाटेल तीं स्टेशनें सोडायची हेंच स्पेशल ट्रेनचें वैचित्र्य. ही गाडी जी. आय. पी. नें जाहिरातखातीं म्हणजे नुकसान सोसून काढली होती; त्यामुळें सगळीकडे आम्ही रेल्वेचे जांवई असल्यासारखा आमचा बडेजाव होता. तिकिटाच्या किंमतींत दोन्ही वेळचीं जेवणें, दोन्ही वेळचा भक्कम चहा, प्रेक्षणीय स्थलांपर्यंतचीं वाहनें व 'दाखवे' ( गाईड ) लोकांचें वेतनही समाविष्ट होतें. शिवाय डॉक्टरी देखरेख आणि एका बड्या अंमलदाराची व्यक्तिशः पालकी वेगळीच. आधींच्या दिवाळीलाच 'युनिव्हर्सिटी स्पेशल' झालेली होती व आमच्या पुढेंच फर्स्ट क्लास टूरिस्ट स्पेशल जात होती. तेव्हां रेल्वेच्या लोकांना आमच्या पाहुणचारासाठीं धडे मिळालेलेच होते. पण या गाड्या रेल्वेला महाग पडल्या; आमच्या गाडीनें त्यांना चांगलीच अद्दल घडली असावी, कारण पुन्हां स्वतः कंपनीनें तशी गाडी 'सोडली' नाहीं; असो. नाशिकच्या थंडींत कुडकुडत आम्ही भोजनरथांत गेलों. टेबलांवरून अगदीं पेशवाई थाट होता. ताटवाट्या, तांब्या भांडीं, उदबत्त्या वगैरे. जेवायला बसतां बसतां गाडीचे पालक अम्मलदार तेथें उभे होते, ते ओळखीचे निघाले. हे पूर्वी माझे प्रोफेसर होते. मी त्यांना 'डॉ. मजकूर' म्हणून हांक मारतांच जवळच बसलेल्या दोनतीन गुर्जर विद्यार्थ्यांनीं कान टवकारले. आमचें बोलणें चालू असतांच लांब केंस–दीड वीत छाती–चष्मा या ठराविक छापाचा एक विद्यार्थी डॉक्टर मजकुरांच्या कुशींत शिरला व बोलण्यांत एक मिनिटाची संधि मिळतांच इंग्रजींत म्हणाला, 'आपण डॉक्टर मजकूर कां? माझ्या छातींत जरा या इथें—'

'मी औषधांचा डॉक्टर नाहीं–' ते म्हणाले.

मी ते अर्थशास्त्रज्ञ असल्याचें सांगितलें.

'हो का ?' तो विद्यार्थी न डगमगतां बोलला, 'डॉ. मजकूर ? सर साहेबांचा पुतण्या ?' डॉक्टरांनीं मान डोलविली.

'मग तुम्हांला विचारायचें होतें, अठरा पेन्सविरुद्ध सोळा पेन्स वादांत आपलें काय मत आहे ?'

'इथें जेवणाच्या जागीं सांगण्यापेक्षां सावकाशीनें बोलूं,' असें डॉक्टर म्हणाले. नंतर त्या विद्यार्थ्यानें आपण अमक्या अमक्या संस्थानच्या दिवाणाच्या मेव्हण्याचे जांवई, अशी आपली ओळख सांगून डॉक्टर मजकुरांशीं दूरचें नातें काढलें......

दुसऱ्या दिवशीं फटफटतांना इटारसी स्टेशन दिसलें. मुंबईपासून आम्ही साडेचारशें मैलाच्यावर मजल मारली होती. नंतर कांहीं वेळानें हुशंगाबादेच्या जवळपासचा विंध्य पर्वताचा लहानसा घाट लागला; पण माझ्यासारख्या बोरघाट्याला त्याची विशेषशी महती वाटली नाहीं. दहा अकराच्या सुमारास भोपाळला पोहोंचलों. हें ठिकाण मुंबईपासून अदमासें पांचशें मैल असल्यामुळें दिल्लीच्या बरोबर अर्ध्या वाटेवर हें शहर आहे. दिल्ली व मुंबई येथील वर्तमानपत्रें शेजारींशेजारींच येथें विकायला दिसतात. इथले पोलीस शिपाई मोठे भव्य वाटले. थोड्या वेळांतच गाडी चालू झाली व भर दुपारीं सांची स्टेशनच्या सायडिंगमध्यें आम्ही जाऊन पडलों.

दुपारचें जेवण व जरूर ती विश्रांति झाल्यावर उन्हें थोडीं कमी झालीं असें पाहून आम्ही सांचीचा इतिहासप्रसिद्ध डोंगर चढलों. हा डोंगर पुण्याच्या पर्वतीपेक्षां लहानच येईल; पण बायका, पोरें, म्हातारे, पंगु, लठ्ठ व जरत्कारू अशा सर्व प्रकारांनीं भरलेल्या आमच्या थव्याला वर पोहोंचण्यास अर्धापाऊण तास लागला. सांचीस्तूप हा भोपाळ संस्थानांत असल्यामुळें भोपाळच्या इतिहाससंशोधन खात्याचे मुख्याधिकारी जातीनें आमच्याबरोबर होते. त्यांनीं येथील बौद्धकालीन अवशेषांविषयीं अत्यंत मनोरंजक माहिती सांगितली. त्या कालाचा इतिहास आमच्या डोळ्यांपुढें उभा केला. भोपाळ संस्थाननें स्तूपाची डागडुगी इतकी छान ठेवली आहे कीं, तो कालच

कांक्रीटनें बांधल्यासारखा वाटला. त्या स्तूपावर बुद्धाच्या जातककथा वगैरे चित्रित केलेल्या आहेत. आमचे दाखवे ( भोपाळ इतिहास-संशोधन खात्याचे मुख्य ) अत्यंत साधे व अत्यन्त विद्वान गृहस्थ होते. यांचें नांव व त्यांनीं सांगितलेली बहुतेक माहिती मी विसरल्यामुळें, त्यांच्याबद्दलच्याच एकदोन गोष्टी सांगून वेळ मारून नेत आहें. स्वारी मोठी विनोदी होती. एका अमेरिकन टूरिस्टनें ( जगप्रवाश्यानें ) आपल्या विवेचनानंतर आपल्या बक्षिशीदाखल हातावर एक रुपया ठेवल्याचें त्यांनीं सांगितलें. त्यांचा गोड स्वभाव पाहून आम्हां सर्वांना ते फार प्रिय झाले. एका अतिप्रसंगीं पारशी बाईनें तर त्यांचें नांवगांव व जातपातही विचारण्यास सुरवात केली ! ते सद्‌गृहस्थ बंगाली होते; पण आपला धर्म ख्रिस्ती आहे हें त्यांनीं निवेदन करतांच शिष्टाचाराचें भान न राहून ती बाई उद्‌गारली, ‘ काय ख्रिस्ती ? ’ संथपणें, ‘ कां ख्रिस्ती असणें हा कांहीं गुन्हा आहे कीं काय ? ’ असा त्यांनींच उलट प्रश्न विचारतां त्या बाईचा एरवीं विशेषसा पाहण्यासारखा नसलेला चेहरा क्षणभर तरी पाहण्यासारखा झाला.

संध्याकाळच्या चहाची वेळ साधण्यासाठीं मोठ्या उत्साहानें आम्ही डोंगर उतरलों. अंधार पडल्यावर पाहुणे मंडळीसाठीं स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवरच सिनेमा दाखविण्यांत आला. मेरी पिकफोर्डची ‘लांबटांगे बाबा’ ( डॅडी लॉंगलेग्ज ) ही फिल्म होती, पण ती जवळजवळ न पाहिल्यासारखेंच झालें; कारण डॉ. मजकूर व मी कॉलेजच्या ठळक आठवणी काढून गप्पा मारीत अगदीं मागच्या रांगेंत बसलों होतों. दोघांनाही विशेष आठवणाऱ्या एका प्रोफेसरांची चेष्टा हा विषय असल्यामुळें गप्पा फार रंगल्या. रात्रीं जेवायला बराच उशीर झाला होता, मुंबईतून एकदम मनस्वी थंडीच्या प्रदेशांत आम्हीं आलों होतों व स्वयंपाकही उत्तम होता. या त्रिविध कारणांनीं सफरीच्या दुसऱ्याच रात्रीं आम्हीं भोजनरथाच्या कंत्राटदाराला पस्तावण्याची वेळ आणली. त्याचे सर्व अदमास चुकले व त्यानें लगेच दुपटीच्या शिध्याची व्यवस्था केली.

त्यानंतरच्या सकाळीं जागे झालों तेव्हां ग्वाल्हेर दिसूं लागलें होतें. स्टेशनांत गाडी गेल्यावर पहिलें दृश्य दिसलें तें नळावर स्नान करणाऱ्या

एका उत्तर हिंदुस्थानी प्रवासी बाईचें. उभ्या लावलेल्या ओल्या वस्त्रां-तून दिसणारें तिचें शरीरसौष्ठव, दोनचार तिथलेच मवाली आपले इतर व्यवसाय सोडून अत्यंत आस्थापूर्वक पाहत होते. सकाळची न्याहारी उरकून आम्ही किल्ल्याच्या पायथ्याशीं पोहोंचलों. आमच्या आधींच्या गाडींतील लोकांना वर चढण्यास हत्तींची सोय करण्यांत आली होती असें ऐकलें, पण आम्हांला मात्र पायींच चढावें लागलें. एका विनोदी गृहस्थांनीं सुचविलें कीं, आमच्या जथ्यांतील कांहीं 'वजनदार' लोक पाहून संस्थाननें आपले हत्ती बचावण्याचें ठरवलें असावें. किल्ल्यावर चढतांना खडकांत जैनांनीं कोरलेल्या अवाढव्य मूर्ति व मंदिरें दिसलीं. (व तशींच उतरतांनाही दिसलीं) किल्ला मिर्झाराजा मानसिंगानें बांधलेला आहे. मानमंदिर हा त्याचा राजवाडा; त्याच्या बाहेरच्या बाजूनें चिनी-मातीच्या 'टाइल्स' बसवून केलेली नक्षी जुनी इत्यर्थ जास्त कौतुकास्पद आहे. प्रत्यक्ष वाडा ठेंगू रजपूत बांधणीचा आहे.एके काळीं या किल्ल्याला लढाऊ महत्त्व फार होतें. बरेच दिवस तो इंग्रजांच्या ताब्यांत होता; पण अलीकडे शिंद्यांनीं झांशीचा किल्ला देऊन आपला किल्ला परत घेतल्याचें समजलें. सध्यां प्रेक्षणीय स्थळ यापेक्षां त्याला महत्त्व नाहीं. झांशीवरून आठवण झाली—जातां येतां झांशी स्टेशन मध्यरात्रीनंतर येऊन गेल्यामुळें आमच्या गांवींही आलें नाहीं.

हो, एक विसरलोंच; किल्ला चढण्याच्या आधीं पायथ्याचें पुराण-वस्तुसंग्रहालय पाहिलें. तेथें कोणी दाखव्या नसल्यामुळें, तेथें ठेवलेल्या वस्तूंबद्दल आपापलेच तर्क चालवून आम्हांला आपली करमणूक करून घ्यावी लागली. किल्ला आम्हीं दुसऱ्या बाजूनें उतरलों. त्या बाजूस चांगला मोटरचा रस्ता आहे, पण संस्थानच्या कांहीं बड्या मंडळींनाच तो वापरायाची परवानगी आहे. उतरल्यानंतर आम्ही राजघराण्याच्या समाधि पाहण्यास गेलों. हें स्मृतिमंदिर मुख्य मूर्ति नसल्यामुळें अगदीं सुनें वाटलें. कारण पाटीलबाबांची छत्री पुण्याजवळ वानवडीला आहे. सर्व पेंढार समाधी पाहून परत येईपर्यंत आम्ही चपळ मंडळी परत येऊन आपल्या मोटारींत बसलों होतों. आम्हांला पाहण्यास गांवांतली बरीच

चौकस मंडळी जमा झाली होती. मुशाफरांना वेगवेगळीं शहरें पाहून जें मनोरंजन होतें, तेंच त्या त्या शहररवासियांना मुशाफरांकडे पाहून होतें यांत शंका नाहीं. आमच्या मोटारीजवळ एक दक्षिणी पगडी धारण केलेला भिक्षुक उभा होता. माझ्या कानडी मित्रांवर छाप पाडण्याच्या हेतूनें मी त्याच्याशीं ( माझ्या मतें ) अस्सल उर्दूत संभाषण सुरू केलें. एकदोन वाक्यांनंतर त्या मूर्खानें मराठींत बोलणें चालविलें व माझे मित्र हंसूं लागले. मला इतका राग आला कीं, मी त्याच्याशीं नंतर एक अक्षरही बोललों नाहीं.

राजवाडा पाहायला जातांना संस्थानी रेल्वेचे रूळ दिसले. ही छुट्टपुटीची रेल्वे भरवस्तींतून जाते; मला वाटतें लायनीवरची गर्दी मोडायला ड्रायव्हरला टांगेवाल्यासारखें ओरडावें लागत असेल. या रेल्वेचा एक फांटा अक्षरशः राजवाड्यांत नेऊन सोडलेला आहे. कै० माधवराव महाराज राज्याची पाहणी करायला पडवींतून एकदम गाडींतच पाय ठेवून फेरफटका करून येत असत. वाड्यांत विलायती शृंगार रेलचेल आहे. कोणताहि संस्थानिक आपली राहणी ( राजकीय कारणासाठीं ? ) विलायती बनवून राजवाड्याचा 'प्यालिस' बनवतो. त्यामुळें बहुतेक संस्थानांच्या प्रासादांतून वंशवैशिष्ट्य क्वचितच राहिलेलें दिसतें. एखाद्या श्रीमंत इंग्रजाच्या घराचें ( पुष्कळदां त्यांतील अभिरुचि वजा करून दिसणारें ) स्वरूप देशी राजवाड्याला आलेलें दिसतें. जुने वाडे व जुन्या गोष्टी राहिल्याच तर प्रेक्षणीय स्थळें म्हणून राखून ठेवलेल्या दिसतात हें प्रेक्षकांचें सुदैवच होय. शिंदे सरकारच्या वाड्याचे हुजऱ्ये मोठे मजेदार दिसले. 'कंगनिदार भर्जरी पिळाची' शिंदेशाही पगडी व खालीं रंगीबेरंगी अंगरखे–कमरबंद–सुरवारी असे त्याचे गणवेश असून कपाळाला दुबोटी आडवें गंध लावल्यामुळें, मराठेशाहीच्या कोणत्याही चित्रपटाला सरदार म्हणून रुपया रोजावर 'हरहर महादेव' करायला ते फार उपयोगीं पडले असते. आमच्या पुण्यास रुपयाला शंभर डोकीं या दरानें भिंतीवर काढलेल्या शिपायांचे ते चालतेबोलते नमुने वाटले.

राजवाड्यांतून गाडीला परत जातांना तानसेनच्या कबरीचें आम्हीं दर्शन घेतलें. या गडबडींत आमचा मोटरींतून टांग्यांत अधःपात झाला होता.

कारण आम्हीं वाड्याच्या बागेंतून जरा रेंगाळत आलों. यानंतर मात्र सावधगिरी ठेवली कीं, पाहायच्या ठिकाणापाशीं उतरून तिकडे जाण्याच्या वेगापेक्षां ठिकाणाहून वाहनाजवळ येण्याचा वेग जास्त पाहिजे. आम्हां स्पेशल सेकंडक्लासच्या उतारूंची मोटारलॉरीज्मध्यें जागा मिळवायची धड-पड थर्डक्लासलाही लाजविण्यासारखी होती. अहमदनगरचे विमा एजंट तर एकदां एका इराण्याशीं चांगलेच हमरीतुमरीवर आले होते ! तानसेनच्या कबरीपाशीं एक भिकारी घसा फोडून ओरडत होता, पण स्थानमहिमा असा आहे कीं, त्याचें तें ओरडणें एका रसिकाला गाण्यासारखें वाटलें व एक आणा देऊन तोडी गायला सांगून भूपरागाचें विडंबन ऐकेपर्यंत त्याचें समाधान झालें नाहीं. तेथें एक चिंचेचें झाड आहे, त्याचा पाला खाल्ला म्हणजे आवाज सुधारून तानसेनाचीही कृपा होते असें ऐकलें. थोड्याच वेळांत आम्हीं त्या झाडाच्या एका फांदीचा ओरबडून अगदीं खराटा करून टाकला. माझें त्या पाल्यानें पोटही भरून गेलें, दांत आंबले व घशाला तोठरा बसला; पण जितका त्रास अधिक तितका अनुग्रहही अधिक या बुद्धीनें मीं निमूटपणें सर्व सहन केलें. त्या रात्रीं अकराच्या पुढें गाडींत कांहीं उत्साही लोकांनीं आपल्या आवाजांचे अदमास घेण्यास सुरुवात केली. पण स्टेशन–पोलिस लगेच धांवून आल्यामुळें तानसेनाची कृपा अजून झाली नाहीं हें त्या लोकांच्या ध्यानांत आलें. चिंचेचा पाला सुमारें सत्तर लोकांनीं खाल्ल्याला सात वर्षें झालीं, पण ज्या अर्थीं आमच्यापैकीं कोणीही बोलपटाचा नायक झाला नाहीं त्या अर्थीं तानसेनाच्या कबरी-जवळची चिंच ही नुसती ( आंबलेली ) दंतकथा आहे असें मानणें भाग आहे.

अर्ध्या दिवसांत ग्वाल्हेर उरकून उरलेला अर्धा दिवस मोकळा ठेवण्यांत आला होता. संध्याकाळीं गांवाबाहेर कसलीशी जत्रा किंवा प्रदर्शन होतें, तें पाहण्यास गेलों; पण पुण्यास सालाबादप्रमाणें शहरांतलीं दुकानें गांवाबाहेर मांडून व मालाच्या किंमती चढवून जें प्रदर्शन भरवण्यांत येतें त्याच प्रकारचें तें प्रदर्शन दिसलें.

त्या रात्रीं भयंकर थंडी वाजली; वरच्या बर्थवर निजल्यामुळें हवेसाठीं ठेवलेल्या भोकांतून सुया टोंचल्यासारखे थंड वारे लागत होते.

मुंबईचे फॅन्सी लोकरी कपडे खऱ्या थंडीला किती निरुपयोगी ठरतात हा अनुभव आम्हांला तेव्हां आला. सकाळीं जागे झालों तेव्हां न्यू देल्ही स्टेशनच्या साइडिंगमध्यें गाडी पडली होती. आमच्या पलीकडे फर्स्ट क्लास स्पेशल उभी होती. त्यांतील उतारूंनीं आमच्या चौपट पैसे दिलेले असल्यामुळें त्यांचा रुबाब अंर्थातच आमच्या चाळीसपट होता. आम्ही एकशें वीस तर ते अवघे पस्तीस; आमची गाडी आपली साधी तर त्यांची सफेद, आम्हांला नुसता एका स्टेशनवरच सिनेमा दाखविण्यांत आलेला, तर त्यांच्या गाडींतच सिनेमा—शिवाय लायब्ररी, रेडीओ, इत्यादि. आम्हांला लॉऱ्या व टांगे तर त्यांना बादशाही टूरिंग गाड्या, आमच्या-बरोबरच्या स्त्रिया कुरूप तर त्यांच्याबरोबर अप्सरा—निदान आम्हांला त्या तशा वाटल्या. खरोखरच द्रव्य ही किती अमोघ शक्ति आहे—

नव्या दिल्लीच्या 'फलाटा'वर तिकडच्या प्रसिद्ध वस्तु म्हणजे कोरीव हस्तिदंती सामान, नक्षीचें पितळी सामान, कलाकुसरीचें काम केलेलें कापडचोपड वगैरे कित्येक प्रकार घेऊन स्थानिक ठक उपस्थित झाले होते. पण आमच्यापैकीं बहुतेकांच्या 'सौदा—गिरी'वरून त्यांनीं ओळखलें असेल कीं, आम्ही अमेरिकन 'टूरिस्ट'च काय पण फर्स्ट क्लासवालेदेखील नव्हतों. न्याहारी करून आमची बाजारबुणगी फौज अकरा जुन्या दिल्लीशहरांपैकीं शक्य तितकीं शहरें पाहून घेण्यास निघाली. थंडीमुळें लोकांच्या पोषाखांत मनोरंजक फेरफार झालेले दिसत होते. अस्सल फॅशनेबल लोक ओव्हरकोट, हातमोजे, मफलर वगैरे आभरणांत नटले होते. पण प्रवासापुरतीच फॅशन करून निघालेल्या हौशी 'साहेबां'चा नूर पुष्कळच उतरलेला दिसला. कांहीं बेळगांवकरांनीं सूट घालून वर महाराष्ट्रीय पद्धतीनें रंग पांघरले होते. कित्येकांनीं एकावर एक असे तीनतीन कोट चढविले होते. कित्ये-कांनीं 'ह्याट'ला रजा देऊन व माकडटोप्या परिधान करून फॅशनवर पाणी सोडलें होतें. सर्वसाधारण दृश्य 'उत्तरध्रुवाजवळील एस्किमो लोक' या भूगोलाच्या पुस्तकांतल्या चित्रांसारखें, किंवा पुण्याचे दरोबस्त पेन्शनर सकाळीं एकदम फिरायला निघाल्यासारखे दिसत होते. माझे स्वतःचे कपडे जाड होते, पण उघडे पडलेले हात गारठल्यामुळें, मास्तरांच्या छड्या खाल्ल्यानंतरच्याप्रमाणें ते बगलेत दाबून धरावे लागत होते.

प्रेक्षणीय स्थलांची सुरवात आम्ही हुमायूनच्या कबरीपासून केली. ही कबर पाहतांच तिच्याभोंवतालची बाग, इमारतीची साफसफाई व एकंदर प्रशांत व रमणीय वातावरण [ जें प्रत्येक ऐतिहासिक स्थळाभोंवतीं ठेवण्यांत आलेलें आहे तें ] पाहून मनाला अत्यन्त आल्हाद वाटला व पुराणखात्याला धन्यवाद द्यावेसे वाटले. हें खातें उत्पन्न करून कर्झन-साहेबांनीं हिंदुस्थानवर अनंत उपकार केलेले आहेत. मी पुण्याचा असल्यामुळें व तेथील अगदीं अलीकडच्या इतिहासाची विटंबना माझ्या डोळ्यांदेखत होत असल्यामुळें मला इकडची सरकारी इतिहासनिष्ठा अद्‌भुत वाटली. पेशव्यांचे वाडे, पेशवाईंतलीं संस्मरणीय स्थळें यांची कत्तल भारत इतिहाससंशोधन मंडळाच्या मुक्कामींच होते हें पाहून 'संशोधन म्हणजे जिवन्त स्मृति गाडून त्यांचीं हाडें पुन्हां उकरून काढणें' असें कोणाला वाटल्यास नवल काय ?

असो, हुमायुनाची कबर साधी पण भव्य आहे. नंतर पाहिलेल्या इन्द्रप्रस्थ अथवा पुराण्या किल्ल्यांत हिंदुराज्याचा ( तटाखेरीज ) अवशेषही दिसला नाहीं, पण हुमायून ज्या जिन्यावरून पडून मेला त्याचें तें पुस्तका-लय मात्र ( पुस्तकविरहित ) पाहिलें. नंतर तुघलघाबाद येथील अशोकाचा स्तंभ वगैरे पाहून काश्मीर गेट, चांदणी चौक या मार्गानें भोजनास परत गाडींत आलों. दुपार मोकळी मिळाली होती. गांवांत फिरायला निघालों व बारा आण्यांत बोरीबंदर ते धोबीतलाव इतक्या अंतरावर पोहोंचवून टांगेवाल्यानें दिल्लीच्या सोदेगिरीचा एक लहानसा अनुभव दिला. दिल्ली शहरांत पांढरपेशावर्ग जवळ जवळ दिसलाच नाहीं. एक फार श्रीमंत किंवा फार दरिद्री असे लोक, व सर्वसाधारण अभिरुचि हलकी. थोडक्यांत म्हणजे चांदणी चौकांत हिंडून मुंबईच्या भेंडीबाजारचा भास झाला. दुसऱ्या दिवशीं सकाळीं कुतुबमिनार पाहण्यास गेलों. येथील पृथ्वीराजच्या वेळचे खांब हेच दिल्लीच्या हिंदुराज्याचे शेवटचे अवशेष असावेत. परत येतां येतां नवी दिल्ली दिसली. लष्करी शिपायांना रांकेनें दरबारांत बसवावें, तशी या नव्या शहराची ठेवण आहे. संध्याकाळीं आयव्हरी पॅलेस म्हणून येथील सुंदर वस्तूंचें टोलेजंग दुकान पाहिलें. लक्षावधि रुपयांचा माल, हिंदुस्थानां-तील जुन्या परंपरागत कलाकौशल्याचे हजारों नमुने वगैरे गोष्टी पाहून

[ व त्यांच्या किंमती ऐकून ] निमूटपणें परत आलों. विलायती मुशाफर व एतद्देशीय राजेरजवाड्यांना घेण्यासारख्या अतिशय सुंदर चीजा या दुकानांत आहेत, तथापि एकाद्या सामान्य मराठ्यालादेखील तेथील सद्गृहस्थ आस्थापूर्वक व निरपेक्षपणें सगळें दाखवितात. हस्तीदंताच्या पातळ पट्ट्यांवर अत्यंत मेहनतीनें चितारलेलीं सुंदर रंगीत चित्रें–Miniatures फार पाहाण्यासारखीं आहेत. पिढ्यानूपिढ्या कलाकुसरीचीं कामें करणारे लोक दिल्लींत अजून आहेत. कारखानदारांच्या नफ्याच्या मानानें त्यांना मेहनताना जेमतेम पोट भरण्यापुरताच मिळतो हें सांगायला नकोच. नंतरच्या सकाळीं जुम्मा मसजिद व दिल्लीचा किल्ला पाहिला. ही मशीद जितकी सुंदर तितकीच भव्य आहे. किल्ल्यांतील राहाण्याचा भाग सर्व संगमवरी असून दिवाण–इ–खास, दिवाण–इ–आम वगैरे जगप्रसिद्ध सभागृहें त्यांतच आहेत. बादशाही स्नानगृहें, विस्तीर्ण उद्यानें वगैरे गोष्टींनीं स्वप्नसृष्टीचा भास होतो. शेवटच्या दालनांत बंडाच्या वेळचे अवशेष, औरंगजेबाचीं अस्सल फर्मानें, जुनीं हत्यारें, जुने कपडे वगैरे ऐतिहासिकदृष्ट्या अमूल्य वस्तु आहेत. एका खोलींत शेवटच्या मोंगल बादशहाची बैठक तो नुकताच उठून गेल्यासारखी लावून ठेवली आहे–हुक्का व पानदानसुद्धां. त्या दुर्दैवी बादशहाचा एक अत्यंत दुर्मिळ फोटो (चित्र नव्हे) वस्तु संग्रहांत आहे. किल्ल्याच्या बाहेर येतांना महाद्वारावरच्या दिवाणखान्यांत या गतवैभवावर मात म्हणून कीं काय इंग्रजबहाद्दरांचीं गेल्या महायुद्धांतलीं विजयचिन्हें जमवून केलेलें पदार्थसंग्रहालय आहे.

दिवाण–इ–खासमध्यें मयूरसिंहासनाची जागा रिकामी आहे. आमच्याबरोबरच्या नव इराण्यांपैकीं (म्हणजे कांठतुटक्या पातेल्यासारखी टोपी घालणाऱ्या लोकांपैकीं) एकाला मी चेष्टेनें म्हटलें, 'काहो, केव्हां देतां आमचें तख्त परत?' नुकत्याच जागृत झालेल्या राष्ट्राची रग त्या सगळ्या इराण्यांच्या नसानसांत भरली होती; तशांत त्या ठिकाणीं सगळेच मुसलमान जरा धुंद झाले होते. तो पर्शियन् म्हणाला, 'थोड्याच दिवसांत, पुन्हां खैबरघाटांतून तुमच्यावर राज्य करायला येऊं तेव्हां घेऊनच येऊं.' स्वतंत्र राष्ट्राच्या आणि जितराष्ट्राच्या माणसांतला फरक मला पुरा जाण-

चला. थोड्या वेळानें आमचा दाखव्या सांगत होता कीं, मराठ्यांनीं या दिवाणखान्याचें चांदीचें छत फोडलें लगेच मी त्या इराण्याला सांगितलें कीं, 'मेहरबान ऐका, ज्या मराठ्यांच्या भीतीनें नादिरशहानें आपला इराणचा रस्ता पकडला, त्यांच्यापैकींच एका मराठ्यानें हें छत फोडलें. तुम्ही नुसती बैठक नेलीत, आम्ही त्या गादीचा निवाराच फाडून टाकला.' तो थंडपणें म्हणाला, 'होय, पण परक्यांना मोकळीक करून दिलींत.'

आग्र्याला आमचा मुक्काम सर्वांत जास्त दिवस झाला. तेथून सिकंद्रा येथें अकबराची कबर पाहण्यास आमची पहिली पोट–सफर झाली. मक्केकडे पाठ करून प्राण सोडणाऱ्या या ऐतिहासिक नवमतवाद्याची खरी थोरवी त्याच्या कबरीपेक्षां आमच्या दुसऱ्या दिवशींच्या सफरींत दिसलेल्या फत्तेपूर शिक्रीला जास्त प्रत्ययाला आली. तें सर्व–धर्म–मंदिर, तीं विलासमंदिरें, ती आदर्श वसाहत या सगळ्या गोष्टी आज त्या थोर ध्येयवाद्याचीं शून्य स्मारकें मात्र होऊन उभीं आहेत. आज अकबराच्या वैभवापेक्षां त्याच्या एका समकालीन फकीरालाच तेथें जास्त महत्त्व आहे. तेथील शेख महंमद चिस्तीची कबर असंख्य मुसलमानांचें यात्रास्थान झालें आहे.

येथील आमचा दाखव्या एक मोठा रुबाबदार मुस्लिम होता. आपण चिस्तीचा वंशज असल्याचा त्यानें निर्वाळा दिला. संवईमुळें तो इंग्रजी व्याख्यान मोठ्या ऐटींत देत असे व बिरबलाच्या सुंदर प्रासादापुढें त्यानें 'मरे यानें म्हटल्याप्रमाणें' अशी सुरवात करून एक फर्डेशाही अवतरणही बोलून दाखविलें. ( मरेचें पुस्तक पाहून ध्यानांत आलें कीं, एक अवतरणच काय पण त्या दाखव्याचें नव्वद टक्के व्याख्यान मरेच्याच शब्दांत होतें. ) परकीय माणसानें वर्णिलेलें स्थानमाहात्म्य पाठ करून स्वतःच्या स्थानिक महत्त्वावर तें खपविण्याची त्या दाखव्याची क्लृप्ति डोकेबाज खरी. ( याच तत्त्वावर नाशिकच्या भांडीबाजारांत बरेचसे दुकानदार मुंबईच्या तारकरांच्या कारखान्यांतलीं नाशिक–घाटाचीं भांडीं फायद्यांत खपवितात. ) सर्व दाखविणें संपल्यावर मात्र, सर महंमद इकबल किंवा असा कोणासारखा तरी आव आणणाऱ्या, एखाद्या संस्था-

निकासारखा पोषाख केलेल्या, शेख महंमद चिस्तीचें नातें सांगणाऱ्या, त्या रुबाबदार दाखव्याचें खरें स्वरूप बाहेर पडलें. ठरलेले पैसे त्याच्या हातावर पडतांच तो एखाद्या टांगेवाल्यासारख्या तक्रार करूं लागला !

या बाजूला दाखवेगिरी हा धंदा मोठा सोईचा आहे; परप्रांतीय दिसणाऱ्या कोणत्याही टोळीपुढें हातवारे करीत कांहीं बडबड करीत चालावें, व ती टोळी परत फिरतांच एकदम हात पसरावा, हा गांवांतल्या वाटेल त्या माणसाला साधणारा रोजगार आहे. मुशाफराच्या सोईसाठीं सरकारी मान्यता मिळविलेले मार्गदर्शक आहेत व त्यांचे दरहि ठरलेले आहेत; पण म्हणून वरच्यासारखे 'स्वयंसेवक'ही कांहीं कमी नाहींत. आम्ही सिक्रीच्या बाहेर पडतांना सुमारें बारा स्थानिक सद्‌गृहस्थांनीं एका रांकेंत उभें राहून आम्हांला 'गार्ड ऑफ ऑनर' दिला व आपण सर्वांनीं आमच्यासाठीं दाखवेगिरी केल्याची ग्वाही दिली; फारफार तर 'इकडे नव्हे तिकडे' इतपत माहिती त्यांच्यापैकीं कांहींजणांनीं दिली असेल, पण सगळ्यांचे हात एका रांकेंत पुढें झाले होते. त्यांची संभावना डॉ. मजकूर यांनीं फार योग्य रीतीनें केली. सर्व मंडळी मोटरींत जाऊन बसल्यावर ते एकटे मागें राहिले होते; त्यांनीं या बुभुक्षितांपैकीं प्रत्येकापुढें जाऊन त्याला लवून सलाम केला व 'भेटलांत, बरें झालें. खुदा आपल्याला सुखी ठेवो.' असें कांहींसें सांगून मोठ्या प्रेमानें त्यांचा निरोप घेतला. त्या सर्वांचे चेहरे त्या वेळीं शिल्पकार फडक्यांनीं (सद्‌हेतूनें) केलेल्या मेणाच्या बाहुल्यांसारखे झाले होते.

फत्तेपूरसिक्रीला जातांनाच मला वाटेंत कोल्ह्याचें तोंड दिसलें होतें व त्याचें ताबडतोब प्रत्यंतर म्हणजे येतांना मोटरींतल्या खिळ्याचा धस लागून माझी एकुलती एक गरम पाटलोण (गुढघ्यावर) फाटली. गाडींत परत पोहोंचल्यावर, दुपारीं जेवणानंतर शरमिंद्या चेहऱ्यानें चोरून मारून, सुईदोऱ्यासाठीं हलकेच चौकशी करीत जी आकृति डब्याडब्यांतून डोकावीत जात होती ती माझीच होती. अखेर एका पारशी गृहस्थानें माझी नड भागवली. निदान फाटलेली पॅंट शिवण्याकरितां तरी सहकुटुंब प्रवास करणें किती आवश्यक आहे हा बोध

त्या वेळीं झाला. संध्याकाळीं आग्रा शहरांत फेरफटका करून आलों. ताजमहालांचीं अनेक दुकानें पाहिलीं व कांहींच घेण्याची शक्ति नसल्यामुळें, दुकानदारांची बनविण्याची मजल कोठपर्यंत जाते, हें पाहत कित्येक दुकानें हिंडलों. परत येतांना लहानांत लहान एक रुपयाचा ताजमहाल घेतला—व तो आपल्या घरीं पोहोंचेपर्यंत खतम् झाला हेंही येथें नमूद करण्यास हरकत नाहीं.

प्रेक्षणीय स्थळें पाहून अर्धे अर्धे दिवस उरत असत. त्यांचा फायदा घेऊन कांहीं लोक मथुरेला जाऊन आले. पण मथुरा हें एक क्षेत्र आहे हें लक्षांत आल्यावर जाण्याची इच्छा झाली नाहीं. भाविकपणा अंगीं नसल्यामुळें लोभीपणा, लुच्चेगिरी, ढोंग, पावित्र्यविडंबन, पाप वगैरे गोष्टींचीं माहेरघरें जीं क्षेत्रें तीं वगळल्यानें कोणत्याही प्रकारचें पारमार्थिक नुकसान होण्याची भीति वाटत नव्हती. क्षेत्रांपेक्षां कदाचित् ताजमहालापाशीं देवाचें सान्निध्य जास्त वाटण्याचा संभव आहे. सौंदर्य, स्वच्छता, शान्तता, गांभीर्य, प्रसन्नता, वगैरे गुणांचा मक्ता देवानें मुसलमानांच्या पवित्र स्थलांनाच दिला असल्यास न जाणो; पण या गोष्टी हिंदूंच्या क्षेत्रांत मिळणें कठीणच. कदाचित् अशीं क्षेत्रें पाहणें हठयोगी भक्तीचीहि एक कसोटी असेल. असो, ज्ञानमार्ग किंवा भक्तिमार्गाची चर्चा उतार वयांतील लेखनासाठीं राखून ठेवून सकाळीं आग्र्याच्या किल्ल्यांत जाणें जास्त बरें. दिल्लीच्या किल्ल्याची ही 'स्वस्त आवृत्ति' आहे. शिवाजीमहाराजांची बंदीशाळा पाहिली. जहांगिरचें काळ्या शिळेचें लाहोरहून आणलेलें (बिछान्याएवढें—जहांगिरलाच योग्य असें) सिंहासन पाहिलें. गझनीच्या महमुदानें नेलेले सोमनाथाचे दरवाजे सर चार्लस नेपियर का कोणीसे परत आणून ठेवलेले पाहिले. किल्ल्यांत असतांना इंग्रजांनीं डागलेल्या तोफांचे गोळे संगमरवरी भिंतींत घुसलेल्या जागा पाहिल्या, शहाजहानच्या अंताचें ठिकाण, सम्मान बुर्झ व त्यांतल्या आंगठीच्या खड्याएवढ्या दगडांत दिसणारें ताजमहालचें प्रतिबिंब पाहिलें—फार काय शहाजहानचा पायखाना व त्यांत उजेड यावा म्हणून बसविलेले हात हात जाडीचे पारदर्शक दगड देखील पाहिले. सम्मान बुर्झांत सर्वांचा एक ग्रुप फोटो घेण्यांत आला (मीं कडेला पडल्यामुळें एका बुटाचें

टोंक व डावी भुंवई इतकाच माझा भाग त्या फोटोंत आहे ). परत गाडीला येऊन पोहोंचलों, तेव्हां माझ्या एका कानडी मित्राची घडीची कॅमेरातिवई (ट्रायपॉड) गहाळ झाल्याचें ध्यानांत आलें. स्टेशनावरच्या वेगवेगळया टांगेवाल्यांना त्या जिनसाचें वर्णन देऊन बक्षीस लावलें. दुपारपर्यंत एक सायकल पंप, एक विजेची हातबत्ती व एक थर्मास बाटली या जिनसा वेगवेगळे टांगेवाले विजयी मुद्रेनें दाखवीत आले, पण खरी वस्तु गेली ती गेलीच. दरम्यान दुसऱ्या कानडी मित्रानें भरदुपारीं एक पंचा लावून प्लॅटफॉर्मच्या नळावर स्नान करून धुणें धुवून गाडीतील सव्वाशें लोकांना चकित केलें.

संध्याकाळीं इतमदुदौल्ला ही ताजमहालच्या खालोखाल सुंदर पण अगदीं छोटी कबर पाहून ताजमहालला पोहोंचलों. दुपारी चार ते रात्रीं नऊ असे भरपूर पांच तास या अनुभवासाठीं राखून ठेवण्यांत आले होते. सूर्यप्रकाशांत, संधिप्रकाशांत व ( त्या रात्रीं पौर्णिमा असल्यामुळें ) चंद्रप्रकाशांत ताजमहालचा मनमुराद आस्वाद घेण्याची मोकळीक ठेवलेली होती. ताजमहालाच्या दरवाजापर्यंत वेड्यावांकड्या रस्त्यांनीं आणून एकदम अनपेक्षितपणें समोर ताजमहाल दाखविण्यांत पुराणखात्यानें मोठी कल्पकता दाखविली आहे. सौंदर्यासाठीं हपापलेल्या मानवी प्राण्यावर ताजमहालचा परिणाम काय होतो हें पाहण्यासारखें आहे. आमच्याबरोबरच्या पारशिणींचीदेखील किलबिल तें दृश्य पाहून बंद झाली, हें सांगितलें म्हणजे त्या परिणामाची कल्पना येईल. त्या नन्दनवनांत मनुष्य आपोआपच हळूहळू कुजबूज करूं लागतो. पहिल्यानें तर तो बराच वेळ देहभान विसरतो. आपले विचार शब्दांत व्यक्त न करणेंच शहाणपणाचें ठरतें. मुख्य इमारतीच्या भोंवतालची बाग इतकी सुंदर ठेवलेली आहे कीं,—जाऊं द्या, कशाला वायफळ शब्द, कोणत्याही शब्दांनीं त्या सौंदर्याची कल्पना यायची नाहीं, चित्रांनीं यायची नाहीं, ‘ संगमरवरी अश्रुबिंदु ’ ही त्याची अगदींच ओबडधोबड व्याख्या आहे. ताजमहाल ही वस्तु नाहीं, हा एक दिव्य अनुभव आहे. सौंदर्याचा यात्रेकरू जगभर वणवण हिंडून शिणलेली कुडी कोठें अखेर ठेवायला मागेल तर ती याच ठिकाणीं. आजूबाजूच्या हरिततृणावर लोळून या प्रेममंदिराच्या मंद छायेंत उरलेलें आयुष्य

व्यतीत करणें हीच एखाद्याला इतिकर्तव्यता वाटेल. इंग्रज लेखक आल्डस हक्स्ले याला ताजमहाल सुंदर वाटत नाहीं—हीच त्याला पुरेशी शिक्षा आहे.

दुर्दैवानें सौंदर्योपासक हृदय परमेश्वरानें शरीराच्या पार्थिव गोळयांत अडकवून ठेवलें आहे. शरीराचे पाशवी विकार हृदयाच्या भावनांना कुस-करून टाकूं शकतात. सुमारें आठ वाजेपर्यंत सर्व प्रकारांनीं, सर्व बाजूंनीं आम्हीं ताजमहाल पाहिला. हळू हळू बघ्यांच्या फिरत्या टोळया ठिकठिकाणीं मुक्काम ठेवूं लागल्या. सुरवातीचें दडपण जाऊन आलेला बेसुमार उत्साह थंडा-वला. सूर्य, संध्या व चंद्र यांच्या प्रकाशांत दिसणाऱ्या त्या स्वर्गाचा अनिमिष नेत्रांनीं अनुभव घेणें संपलें. स्वतःच्या क्षुल्लकपणाची एक प्रकारची जाणीव सगळयांच्या मनावर आली. प्रेमसमाधीवरच्या त्या शीतल कौमुदीमुळें एक अत्यंत खिन्न असें वातावरण निर्माण झालें.

पण हळू हळू थंडीमुळें शरीराबरोबरच रसिकपणाही गारठूं लागला. भूक—जगांतल्या सर्व उदात्त भावनांची, कोमल विकारांची, हृदयाच्या संगी-ताची वैरीण भूक—सर्वांना ग्रासूं लागली. कांहीं कालापूर्वी उचंबळणारीं मनें आतां पोटांतल्या आगीच्या आधीन झालीं. या विचारानें शरमून एकमेकांशीं एक अक्षरही न बोलतां एकशेंवीस माणसें आपल्या गाडीकडे परतलीं. रात्रीं जेवण झाल्यावर कांहीं लोक पुन्हां ताजमहाल पाहायला गेले होते, पण मला ही कल्पना रुचली नाहीं. जन्मांत बहुतेक एकदांच मिळणारा अनु-भव एखाद्या कृपणासारखा उराशीं बाळगून जन्मभर त्याच्या अंधुक स्मृतीचे मणी ओढीत बसणें बरें, कीं नाविन्याचें काव्य सलगीनें मारून नुसती कोरडी स्पष्ट आठवण ठेवणें बरें ?

परत येतांना एक दिवस भोपाळ पाहण्यांत घालविला. ‘तालमें ताल’ भोंवतीं बसलेल्या त्याच शहराला तेवढा सृष्टिसौंदर्याचा थोडा वांटा मिळाला आहे. बाकी सबंध प्रवासांत रूक्ष, सपाट व कंटाळवाणा प्रदेशच दिसला. एवढीं दिल्ली आग्रा शहरें, एवढी जमना नदी, पण सृष्टिसौन्दर्याचें नांव नाहीं. त्यापेक्षां आपण महाराष्ट्रीय किती भाग्यवान्. पुण्याजवळच्या टेकडीवर उभें राहून दिसणाऱ्या भोंवतालच्या भव्य देखाव्याची सर कोणत्या मानवनिर्मित राजधानीला येणार आहे ! तीच

गोष्ट लोकांच्या स्वाभिमानाची. साहेबी टोपी पाहिली कीं सलाम, ही तिकडची दास्यवृत्ति महाराष्ट्रांत खात्रीनें नाहीं. आपल्या दरिद्री लोकांची गुर्मीच तिकडच्या लाचारीपेक्षां बरी वाटते. आमच्याकडे गतवैभवाचे मनोरे नाहींत, पण गतराज्याच्या खेदाचे चालतेबोलते पुतळे आहेत— ते काय कमी प्रेक्षणीय आहेत ? परप्रांतांत जसजशा सफरी कराव्या, तसतसा आपण महाराष्ट्रीय असल्याचा अभिमान किंवा दुरभिमान, वाढत जातो. उलट महाराष्ट्रांत येऊन जाणाऱ्या परस्थालाही तो स्वतःच्या प्रांतांबद्दल तितकाच वाटत असेल. याच अभिमानाला पेटून इराणी लोकांच्या पातेली टोपीला उत्तर म्हणून दिल्लीला पोहोंचल्यापासून मी हॅटच्या बदली आपली अस्सल ‘तात्या टोपी’ घालून हिंडत होतों. तऱ्हेवाईकपणा केल्याशिवाय महाराष्ट्रीय बाणा नाहीं तर कसा दाखवता येणार ?

———

# ध्येयवादी कलाकृति

६

बोलपटाची कला जी हीन स्थितीप्रत जाऊन पोहोंचली आहे, ती उच्च पदवीला आणण्याच्या हेतूनें प्रेरित होऊन आम्हीं एक स्वतःची सिनेमा कंपनी काढायची असें ठरविलें. आमच्यापैकीं वसन्ताजवळ बापकमाईचे पैसे पुष्कळ होते व आम्ही सगळे बेकार त्याच्या कच्छपीं होतों. 'कला' 'संस्कृति' 'ध्येयवाद' वगैरे गूढ व अप्रमेय गोष्टी तो नेहमीं बोलायचा व आम्ही मान डोलवायचे; कारण या गोष्टी निरुद्योगी श्रीमंतांचे खेळ व बेकार अर्धशिक्षितांचे उद्योग आहेत, हें आम्हांला पटलें होतें.

सिनेमा कंपनी काढण्यास भांडवल ही सर्वांत महत्त्वाची सबब सांपडल्यानंतर लोक कोणकोण घ्यायचे हें आम्ही ठरवूं लागलों. आम्हांला धंदा म्हणून बोलपट तयार करायचा नव्हता, तर कलेची सेवा, संस्कृतीची जोपासना व ध्येयाचा अभ्यास म्हणून कार्य करणें होतें. धंद्यांतले रूढ नियम बाजूला सारून, सर्व ठराविक गोष्टींना फांटा देऊन, केवळ स्वतःच्या हिंमतीवर आम्हांला स्वतंत्र प्रयत्न करायचा होता. बाजारासाठीं कांहींही करायचें नाहीं हें आमचें ब्रीदवाक्य होतें. धंद्याशीं यत्किंचित् संबंध असेल असें एकही माणूस घ्यायचें नाहीं असें आम्हीं ठरविलें. वसन्त हा मालक शेतकी कॉलेजचा ग्रॅज्युएट होता. त्याच्याभोंवतीं घोंटाळणारे आम्हीं सहाजण मॅट्रिकफेल पासून बी. एससी.-पर्यंत कमीजास्त शिकलेले होतों. आम्हांला त्यानें सहाय्यक म्हणूनताबडतोब नेमून टाकलें. मालक असल्यामुळें डिरेक्टर वसन्त स्वतःच होणार होता, इतकेंच नव्हे तर नायक, संगीतशास्त्री, कथालेखक, एडिटर, सिनॅरिओ–रायटर व जमल्यास (दुहेरी भूमिका करून) खलपुरुषही होण्याचा त्याचा बेत होता.

एक स्टूडिओ भाड्यानें घेऊन 'हायरे हाय!' ही ध्येयवादी शोककथा घेण्याचा वसन्ताचा निश्चय होता. या कथेंत हिंदुस्थानाचें दारिद्र्य,

स्त्रियांची उन्नति, ग्रामसुधारणा, सुवर्णपरिमाण, संयुक्त मतदारसंघ, देवदासीपंथ, दारूबंदी, सक्तीचें लष्करीशिक्षण, सर्व धर्मांचें एकीकरण, संततिनियमन वगैरे सर्व विषयांचा समाचार घेण्यांत आला होता. या कथेसाठीं निव्वळ हौशी, उच्चकुलीन व सिनेमाशीं थोडीदेखील ओळख नसलेल्या सुसंस्कृत स्त्रीपुरुषांस आम्हीं गोळा करून आणलें. मुख्य स्त्री भूमिका गं. भा. सगुणाबाई पंडित एम. ए. बी. टी. या वयोवृद्ध बाईंना देण्यांत आली. वसन्ताच्या कथेंत 'रोमान्स' वगैरे चावटपणा नसल्यामुळें स्त्रीभूमिका फक्त मातृप्रेम व नंतर कन्याप्रेम दाखविणाऱ्या होत्या. बाकीच्या दोन स्त्रीभूमिका सौ. जमनाबेन व्होरा या एका प्रोफेसराच्या पत्नीस व सौ. आइमाई बिलाडीवाला या एका सॉलिसिटरच्या मातुश्रीस अशा देण्यांत आल्या. छोट्या स्त्रीभूमिकांसाठीं वेळोवेळीं बौद्धमठांतील भिक्षुणी आणण्याचें ठरलें. पुरुष–भूमिका देतांना देशसेवा, प्रसिद्ध व्यक्तीचें नातें व ललितकलांखेरीज अन्य विषयांतील प्रसिद्धी या गोष्टींकडे लक्ष दिलें होतें. तदनुसार, सूत काढण्याच्या चढाओढींत मुंबई इलाख्यांत पहिला आलेला जसवंतराय ठक्कर, लाला लजपतरायांच्या चपराशाचा मुलगा फणीराम, व सुप्रसिद्ध शस्त्रवैद्य डॉ. ढोपरे यांना मुख्य भूमिकांसाठीं ताबडतोब ठेवण्यांत आलें. बारीकसारीक कामासाठीं लागणारे लोक मसूर ब्रह्मचर्याश्रम, गोरक्षणसंस्था व प्रतिवादी–भयंकर–मठांतून घ्यायचें ठरलें. वसन्ताला दुय्यम मदतनीस म्हणून, माहितगार पण धंद्यानें न डागळलेला असा एक मनुष्य त्यानें ठेवला; तो म्हणजे महिषेंद्र ढोस; या गृहस्थानें हॉलिवुड येथें झाडूवाला म्हणून तीन वर्षें काम केलें होतें.

'अहो–ध्वनि मूव्हिटोन' असें कंपनीचें नांव ठेवून महात्माजींच्या वाढदिवशीं मुहूर्त करण्यांत आला, व तत्प्रीत्यर्थ सर्वांनीं उपास केले. कंपनीच्या नांवाबद्दल वसन्तानें असा खुलासा केला कीं 'सिनेमा कंपनी म्हणजे रात्रीचे आवाज–पक्षीं पापाचे पडसाद–म्हणून लोकांचा ग्रह झाला आहे, तो घालविण्याकरितां दिवसाच्या आवाजाचें वातावरण आपण निर्माण केलें पाहिजे, म्हणून 'अहो–ध्वनि' हें नांव; शिवाय या नांवाचा सूचक अर्थही

त्यानें लक्षांत आणला, व कंपनींत नियम केला कीं, 'नवेपणाची भीति घालवून परस्परांस विश्वास आणण्यास 'नमस्कार' या अभिवादनाऐवजीं एकानें 'अहो रूपम्' व त्यावर दुसऱ्यानें 'अहो ध्वनिः' अशी सलामी द्यावी.

कंपनीच्या मुक्कामांत शुद्ध वातावरण ठेवण्यासाठीं शिकस्त केली होती. स्टूडिओचें किंवा 'शूटिंग'चें नांवही जागेंत काढावयाचें नाहीं असा सक्त नियम होता. जिकडेतिकडे देशभक्तांच्या व समाजसुधारकांच्या तसबिरी, संतांचीं वचनें व सिनेमाव्यतिरिक्त इतर करमणुकींच्या सोई ठेवलेल्या होत्या. रेडिओ, फोनो, संगीतांचीं वाद्यें, पत्ते, गंजिफा, बुद्धिबळें कॅरम वगैरे बैठे खेळ, उपाहाराची व्यवस्था वगैरे सर्व तयारी जय्यत होती. कोणाला जांभई आल्यास 'कल्चर, कल्चर' असें चुटक्या वाजवीत म्हणण्याची सक्ती असून, वरील सुखसोईंचा ध्येयवादी उपयोग न करणारावर मालकाची अवकृपा होण्याचा संभव होता. उच्च संस्कृतीला पोषक असे बैठे खेळ न जमल्यामुळें एका कलावंताला कामावरून दूर देखील करण्यांत आले होते. यानंतर एका उत्साही नटानें 'क्यारम'मध्यें गती मिळवून पगारांतही बढती मिळविली होती. 'सिनेमॅटिक' किंवा पार्थिव प्रेमाला कडक निर्बंध होता, पण पवित्र प्रेमाला आडकाठी नव्हती. व्याख्येच्या सूक्ष्मतेमुळें एकदां घोटाळा झाला; पवित्र प्रेमानें सुरवात करणारें एक जोडपें शूटिंगच्या वेळीं स्टूडिओंत एका सेटिंगमागें परस्परांच्या बाहुपाशांत सांपडलें. वसंतानें शिक्षेदाखल पुरुषाला चार दिवस उपास व स्त्रीला मुंडण फर्माविलें. पण ध्येयवाद विसरलेली ती कलेची पुजारीण, अत्यंत असंस्कृत रीतीनें वसन्ताचा चेहरा ओरबडून निघून गेली.

सुमारें दोन महिने सिनॅरिओ, संवाद, तालमी व संगीत यांत गेले. बरेचसे संवाद संस्कृत भाषेंत, कांहीं पर्शियन व कांहीं इंग्लिशमध्यें होते. वसन्ताच्या मतें हिंदुस्थानची आधुनिक संस्कृति या तीन भाषांच्या मिश्रणानें बरोबर व्यक्त होत होती. कथानक अगदीं आजतागायत असून तें रोजच्या पोषाखांत, तोंडाला रंग न लावतां वठविण्याची वसन्ताची प्रतिज्ञा होती. धंद्यांतल्या स्टोरीप्रमाणें 'क्लायमॅक्स' (सार किंवा उत्तरोत्तरोत्कर्ष)

'पंचेस' (कथेंतील खटके) किंवा 'सस्पेंस' (उत्कंठा) वगैरे गांवठी अंगें कथानकांत बिलकूल ठेवलीं नव्हतीं. एका माणसाचे निरनिराळे अनुभव एका मागून एक जोडले होते—एका गोष्टीचा संबंध दुसऱ्या गोष्टीशीं केव्हांही नव्हता, तर वास्तव जीवनांतील कांहीं प्रसंग दाखवून वर दिलेल्या यादींतलीं तत्वें विशद करण्याचा प्रयत्न केला होता.

संगीताच्या बाबतींत मात्र नवमतवादी संस्कृतीला वसन्तानें भरपूर वाव दिला होता. राग व ताल अशीं बनावट बंधनें झुगारून दिलीं होतीं. संगीत हा भावनांचा पडसाद असें तत्त्व धरून त्यानें स्वतः चाली तयार केल्या होत्या. ( अशा एका चालीवर गाण्याची तालीम चालू असतां रस्त्यावरून जाणाऱ्या कांहीं इसमांनीं घाबरून फायर ब्रिगेड व अम्ब्युलन्सला वर्दी देऊन पोलीसही आणले होते. त्यांची समजूत घालून त्यांना वाटेस लावतां लावतां आम्हाला नाकीं नऊ आले. ) सात सूर हा सर्व संगीताचा पाया असल्यामुळें, प्राथमिक किंवा मूलभूत भावनांचा परिपोष नुसत्या सप्त स्वरांवर वसंतानें केला होता. उदाहरणार्थः—

संतोष— सा—रे —ग—म—प—ध—नी—सा<br>
सा—नी—ध—प—म—ग—रे —सा

प्रेम— साऽऽऽरे ऽऽऽगऽऽऽमऽऽऽपऽऽऽ...<br>
साऽऽऽऽऽऽधऽऽऽपऽऽऽमऽऽऽ...

धास्ती— सा ?—रेग ?—मपध ?—नीसा ?<br>
सानी—ध—पमग—रे —सा

आश्चर्य— सा ! रे ! ग ! म ! प ! ध ! नी ! सा !<br>
सा ! नी ! ध ! प ! म ! ग रे ! सा !

इत्यादि. या नोटेशनचा प्रभाव वसन्ताला शिकवितांना पाहण्याखेरीज, बरोबर कळणें शक्य नाहीं. नेहमींच्या वाद्याखेरीज नवयुगसंगीत प्रवर्तक वाद्येंही आमच्या ऑर्चेस्ट्रामध्यें होती; राकेलचा पंप, करवत, पत्रा—हातोडा, किंकाळ्या फोडणारीं लहान पोरें इ.

धंद्यांतल्या हलक्या लोकांसारखें भरमसाट काम करीत न सुटतां, कलोपासकांस शोभेल अशा प्रतिष्ठित धिमेपणानें आम्ही काम करीत होतों.

आठवड्यांतून सुमारें दोन दिवस तासदीडतास शूटिंग चालत असे. अभिनयांत देखील घिसाडघाई न करतां, पांच मिनिटांस एक अंगविक्षेप, तीन शब्द व साडेसहा स्वर असें प्रमाण आम्हीं ठेवलें होतें. वास्तवदर्शनाबरोबर सूचक तन्त्र ( Symbolic Technique ) ही आम्ही वापरीत असल्यामुळें पात्रांची नेहमींच जरूर होती असें नाहीं. बाजारी अर्थानें आमची ' कथा ' अशी कधींच नसल्यानें, सातत्य ( Continuity ) विकास ( Developement ), स्वभावाविष्करण ( Characterisation ), असल्या भानगडी कधींच उपस्थित होत नव्हत्या.

अखेर एका वर्षाच्या शेवटीं वसन्ताचा बोलपट तयार झाला. तो अतिशय उच्च दर्जाचा होणार याबद्दल काडीमात्र शंका नव्हती. कारण कंपनींत आमच्या अन्नदात्याबद्दल शंका घेणें कृतघ्नपणाचें होतें. वेगवेगळ्य वेळीं घेतलेले तुकडे मागेपुढें जोडून, आधेमध्यें कांहीं टाकून सुमारें सात हजार फूट लांबीचा ' हिंदुस्थानचा पहिला सांस्कृतिक बोलपट ' वसन्तानें तयार केला होता. त्याची ' ट्रायल ' एके दिवशीं सकाळीं घेण्यांत आली.

पण मधेंच आमच्या प्रसिद्धीखात्याबद्दल थोडें सांगितलें पाहिजे. डॉ. दंडापाणी पी. एचडी. या गृहस्थांना आमचे पब्लिसिटी ऑफिसर नेमण्यांत आलें होतें. 'तौलनिक तत्वज्ञान' या विषयावर त्यांनीं पदवी मिळविली असल्यामुळें वरील नोकरीला ते किती लायक होते हें सांगायला नकोच. आमच्या बोलपटाबद्दल थोडथोडा मजकूर पाहिल्यानें जर्मन, स्कँडिनेव्हिअन व यिडिश भाषेच्या नियतकालिकांतून येऊं लागला. नंतर हिंदुस्थानांतल्या शिष्ट उच्चभ्रू ( Highbrow ) पत्रांतून नुसतीं प्रश्नचिन्हें देण्यांत आलीं, व हळूहळू निवडक साप्ताहिकांतून नुसत्या कोऱ्या जागा टाकण्यांत आल्या. यापेक्षां हलक्या दर्जाची प्रसिद्धी करण्यास डॉक्टरमजकूर तयार नव्हते. अभिरुचीची ही परमावधी पाहून आम्हीहि खूष झालों. आमचीं भिंतचित्रें [ Posters ], फोटो वगैरे इतर गोष्टीहि बाजारी नसून सूचक होत्या व सामान्य लोकांना त्या कळूं नयेत एवढाच आमचा कटाक्ष होता.

आमच्या 'ट्रायल'ला सुद्धां वाटेल त्या 'आदमी' ला आम्हीं येऊं दिलें नाहीं. निवडक सांस्कृतिक, कांहीं ध्येयवादी व थोडे कलाचिकित्सक

इतक्यांनाच निमंत्रण होतें. कंपनीची सर्व मंडळी अर्थात्च हजर होती; पण दुर्दैवानें त्या थिएटरांत आधीं झालेल्या एका गांवठी चित्राच्या ट्रायलला आलेले कांहीं धंदेवाईक तेथें आधींच बसले होते ते आमच्या लक्ष्यांत आले नाहींत. ट्रायलच्या वेळीं मी वसन्ताजवळ बसलों होतों, त्यामुळें पडद्यावर चाललेल्या घडामोडीचा अर्थ मला थोडथोडा समजला. पहिली ऋग्वेदांतील एक ऋचा पडद्यावर आली,

पार्श्वसंगीत— साऽऽऽऽऽऽरेऽऽऽऽऽगऽऽऽऽऽ
गऽऽऽऽऽऽरेऽऽऽऽऽऽसाऽऽऽऽऽ

तदनंतर एक हजार फूट पडद्यावर नुसत्या पांढऱ्या चौकटीशिवाय कांहींच दिसलें नाहीं. पार्श्वसंगीत नरकांत तळमळणाऱ्या हजारो आत्म्यांच्या आक्रोशासारखें होतें. वसन्त म्हणाला 'हें दृश्य पावित्र्यसूचक आहे.' लगेच खेडेगांवांतील एक उकिरडा दाखविण्यांत आला; त्याच्यानंतर वृद्ध सगुणाबाईच्या मांडीवर निजून रडणारा वसन्त व त्याचे एक गूढगुंजन हें दृश्य झालें. (या सुमारास आधींच्या ट्रायलला बसलेले निम्मे लोक उठून गेले.) आतां तीन हजार फूट नुसता काळोख दिसला;'मागचा आवाज' म्हणून ऑर्गनची पहिली पट्टी वाजत होती. 'घोर निराशा—' वसन्त गुणगुणला. नंतर एक बाई एक रुपया जमिनीवर आपटीत बसलेली दिसली; तिचें रूपान्तर दारूच्या बाटलींत झालें; ती बाटली एकदम बंदुकांच्या आवाजांनीं फुटली व एक पलटण समोरून गेली, पाठोपाठ कांहीं बायका ऊर बडवीत गेल्या. 'पाश्चिमात्य संस्कृतीचा लढाईत हाहा:कार' वसन्तानें खुलासा केला.

तो बोलपट अखेरीस संपला. वसंत माझ्या शेजारीं खुलासा करण्यास नसता तर मला तें एक दुःस्वप्नच वाटलें असतें. पण तो शेजारी असल्यामुळें आपल्याला कांहींतरी उदात्त अनुभव घडला ही खात्री झाली. ट्रायल संपल्यावर पाहुण्यांनीं वसन्ताचें अभिनंदन केलें. एका शिष्टांनीं भाषण केलें, ते गृहस्थ इतके ऊच्चभ्रू होते कीं भुंवया केसांत मिसळल्यामुळें त्यांना कपाळच दिसत नव्हतें; त्यांच्या भाषणांतील एक अक्षरही मला कळलें नाहीं, पण त्यांनीं उद्यांच्या संस्कृतीविषयीं सांगणाऱ्या या भविष्यवादी ( Prophetic and futuristic ) बोलपटाची तारीफ केल्याचें

मला नंतर समजलें. पहिल्या ट्रायलला आलेले लोक मात्र हंसत पुटपुटत आपल्या जंगलीपणाचें प्रदर्शन करीत निघून गेले.

'हाय रे हाय!' हा बोलपट शोकपर्यवसायी खरा, पण त्याचा इतिहासही तसा होईल ही आम्हांला कल्पना नव्हती. तो लावण्यास एकही थिएटर पैसे घेऊनदेखील तयार झालें नाहीं; इतकेंच नव्हे तर शैक्षणिक संस्थांनींदेखील तो नाकारला. एका जत्रेंत तो मोफत दाखविला असतां दंगा होऊन प्रोजेक्टर व पडदा यांची ऑपरेटरसकट होळी करण्यांत आली. जीवदयासंघानें त्याला हरकत घेतली व तुरुंगखात्यानें 'राजबंद्यांनादेखील हा चित्रपट दाखविणें अमानुष शिक्षा आहे.' असा अभिप्राय दिला. फ्रान्सला हा चित्रपट पाठविण्याची बातमी तिकडे कळतांच राजकीय संबंध (Diplomatic relations) तोडण्याची त्यांनीं ब्रिटनला धमकी दिली. कांहीं लोकांनीं कोर्टाकडून चित्रपटावर इंजंक्शन आणलें. वसन्ताच्या भाऊबंदांनीं दोन डॉक्टरांकडून त्याला 'सर्टिफाय' करवून ठाण्यास पाठविलें.

तेथेंच तो आहे—

व मीही तेथेंच आहे......

---

१]

अजीब चित्राफोन
मुंबई ता.......१९३५

**मेसर्स मच्छर, दाणी अँड सन्स,**
**अॅडव्हर्टायजिंग एजन्टस्, मुंबई.**

महाराज,

वरील कंपनीचा खालीं सही करणार मॅनेजर मी, आपल्याकडे दोन तीन वेळां येऊन गेलों, पण आपली भेट झाली नाहीं. वरील कंपनीची प्रसिद्धी करण्याचें कंत्राट मी आपणांस देऊं इच्छितों. तत्प्रीत्यर्थ शोध करण्यास, जाहिरातीचे व कमिशनचे दर विचारण्यास, आपली खासगी मुलाखत पाहिजे होती. तरी शक्य तितक्या लौकर भेटण्याचें करावें.

आमची जाहिरात जरी इतक्यांत सुरू करणें नाहीं, तरी मोफत प्रसिद्धीचा मजकूर सर्वत्र देण्यास हरकत नाहीं; त्याचा खर्डा सोबत पाठवीत आहे, व माझा फोटोही जोडला आहे. माझ्या मध्यस्थीनें कंपनीला दोन नटी मिळाल्या व त्यामुळेंच कंपनी उभी राहिली, हें आपल्याला माहीत असेलच. नसल्यास ही माहिती कोठें तरी छापली जाईल अशी व्यवस्था व्हावी. माझ्या फोटोचे ब्लॉक सर्व पत्रांतून देऊन त्याखालीं माझें नांव व 'अजीब चित्राफोनचे मॅनेजर' असा मायना स्पष्ट द्यावा. कळावें, हे विनंति. धंद्यांत पाऊल रोंवण्याच्या माझ्या प्रयत्नांत मी आपल्या मदतीची भिक्षा मागत आहे.

आपला,
**त्रिविक्रम शंभो कुमठेकर,** बी. ए. ( ऑनर्स )
मॅनेजर, अजीब चित्राफोन, मुंबई.

ता. क. माझ्या डिग्रीबद्दल माझे शत्रू खोट्यानाट्या बातम्या पसरीत आहेत. पण मीं वडूज युनिव्हर्सिटीचा ग्रॅज्युएट आहे हें आपल्या माहितीसाठीं लिहितों.

त्रि. शं. कु.

२]

मे. मालकसाहेब यांस—

कंपनीच्या 'राइट अपस्'मध्यें फक्त हीरॉइनचें व कुमठेकरांचेंच नांव असतें. माझ्याबद्दल कधीं लिहिलेंच तर मी पूर्वी 'क्लॅपर बॉय' होतों एवढीच माहिती येते. हा अन्याय दूर करण्याची वेळींच व्यवस्था व्हावी. कळावें.

आपला,

बाबुराव सरनाईक

सिनेमा आर्टिस्ट व डिरेक्टर.

३]

मुंबई, ता......१९३५

शेठ दाणी यांस—

'टिमकी' या वर्तमानपत्रांत संपादकाच्या हस्तें, मजकुरांतच जाहिरात करायला काय आकार पडेल तें कळवावें.

आपला,

त्रि. शं. कु.

ता. क.—एका वर्तमानपत्रांतील जाहिरातींत माझ्या नांवापुढें बी. ए. (आनर्स) व नांवाखालीं 'मॅनेजर' म्हणून छापलें नाहीं. तरी यापुढें काळजी घ्यावी.

४]

बॉम्बे, ता......१९३५

शेठ साहेब यांस अनेकोत्तम दंडवत,

आपली हीरॉइन मिस् वैतरणी हिच्या वतीनें मी लिहीत आहें. पेपर्समध्यें आपण तिचें नांव मोठ्या टाइपांत छापावें.

गेल्या शनिवारीं फक्त आठ पेपरांतच तिचें नांव आलें, तेव्हांपासून तिला खोकला झाला आहे.

कुमठेकरांनीं आमच्याशीं करार केला तेव्हां आपण असें कराल, अशी आमची कल्पना नव्हती.

आपण वेळेवर सुधारणा कराल अशी आशा आहे. कारण आम्हांला प्रभात, बॉम्बे टाकीज, इंपीरिअल, रणजित व सागर या कंपन्यांतून बोलावणीं आलीं आहेत.

आपला,

**व्ही. मंगेश म्हापसेकर**

( मिस वैतरणीच्या वतीनें )

५ ]

**मच्छर, दाणी आणि सन्स**

ॲडव्हर्टाइझिंग एजन्टस्, **मुंबई** ता......१९३५

**मॅनेजर, अजीब चित्राफोन यांस—**

'टिमकी' पत्राच्या संपादकाचे दर खालीलप्रमाणें आहेत—

| | |
|---|---|
| फक्त कंपनीची बातमी (उद्गार चिन्हांसह) | २ रु. |
| अर्धा कॉलम नटीची स्तुति. | ५ रु. |
| एक कॉलम सर्वसाधारण तारीफ. | १० रु. |
| अर्धा पेज बेहद्द मजकूर. | २५ रु. |
| एक पेज मसालेदार, चमचमीत स्तुति. | ५० रु. |

जादा उद्गारचिन्हें, 'शाबास' वगैरे शब्द, 'इंग्लिश' वाक्यें, 'कोट्या' 'काव्य' इत्यादींना स्पेशल चार्ज पडेल.

आपल्या हुकमाची वाट पाहणारे नम्र,

**मच्छर, दाणी ॲंड सन्स.**

६ ]

**प्रोप्रायटर,**

**अजीब चित्राफोन यांसी,**

मी कंपनीचा हीरो असून अजून माझा फोटो कुठेंच आला नाहीं. वैतरणीच्या चौसष्ट ष्टिल्स घेतल्या व माझ्या चारच घेतल्या. माझें 'लाइफ' देखील कोठें छापून आलें नाहीं.

माझे अजून बारा सीन्स बाकी आहेत व मला हॉलिवुडहून 'कॉल' आला आहे, हें विसरूं नये.

आपला,

**एन्. विदूर**

(हीरो)

७ ]

मुंबई, ता......१९३५

अर्जंट

**प्रिय दाणी शेठ,**

'नगारा'पत्रांत आमच्या कंपनींत मॅनेजर व हीरो यांची मारामारी झाल्याची बातमी आहे, तिचा ताबडतोब इनकार करावा. 'टिमकी'च्या संपादकास फुलपेज जाहिरात द्यावी व अशी मारामारी झालीच नाहीं, असें त्यांना संपादकीय मजकुरांत ठांसून लिहिण्यास सांगावें. रोख पैसे पाठवीत आहे. मी जरा लंगडत असल्यामुळें मला जातीनें येतां येत नाहीं.

खोट्या बातम्या पसरविणारांविरुद्ध 'टिमकी'कारांस जोरांत लिहिण्यास सांगणें. 'नगारा' पत्रालाही ताबडतोब जाहिरात द्यावी.

आपला,

**त्रि. शं. कु.**

ता. क.—ही बातमी फुटली कशी ?

८]

मुंबई ता......१९३५.

**मालक, अजीब चित्राफोन यांस,**

पिक्चरमध्यें काम करणारे तर दुनियेच्या पुढें नेहमींच असतात; पण आम्ही प्रत्यक्ष तुमचें पिक्चर काढून देणारे लोक, त्यांना साध्या वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करायला तुम्हीं तयार नाहीं, याबद्दल वाईट वाटतें. आम्हीं आहोंत म्हणून तुमचें पिक्चर आहे हें विसरूं नये.

खाली सही करणार टेक्नीशिअन्स विनंति करतों, कीं डायरेक्टरच्या बरोबर सोबतच्या यादींतल्या सगळया टेक्नीशिअन्सचीं नांवें आलीं पाहिजेत. तुम्ही एक पिक्चर काढून जाल, पण आम्हांला पुढें पोटें भरायचीं आहेत. आमचीं मनें अस्वस्थ ठेवूं नयेत ही विनंति. नाहीं तर आमच्या हातून यंत्रें बंद पडायला लागतात.

आपले,

**के. एल. टक्के** (रेकॉर्डिस्ट)

**व्ही. टी. टोणपे** (कॅमेरामन)

९]

बॉम्बे,...१९३५

**शेठसाहेब यांस अनेकोत्तम दंडवत,**

इतर नांवांच्या गर्दींत मिस वैतरणीचें नांव दिसत नाहीं. तरी दोन इंचाच्या टाईपांत तिचें नांव आलें पाहिजे. तिचें खरें नांव काशी ही गोष्ट प्रसिद्ध करायची नव्हती.

एका जाहिरातींत हीरो विदूर यांना ‘उच्च घराण्यांतील’ म्हणून म्हटलें आहे, मग वैतरणीला कां नाहीं? तिची आई एका श्रीमंत, घरंदाज जहागिरदाराकडे कांहीं दिवस रहात होती. तरी तिचीही जाहिरात ‘राजघराण्यांतील सुशिक्षित कन्या’ अशी करावी.

तसेंच कुमठेकर जर आपल्या नांवापुढें बी. ए. लावतात तर आमची हीरॉइनही इंटरपर्यंत शिकली आहे असें प्रसिद्ध करावें. नाहींतर इतर नटींत हिरॉइनचा बोज राहात नाहीं.

आपला
**व्ही. मंगेश म्हापसेकर**
( मिस् वैतरणीच्या वतीनें )

**१० ]**

**म्यॉनेजरसाहेब यांशीं—**

अडवरटाइज आपन करता म्हनून लिहितों. कंपणींत सगळ्यांत जुणा व अनुभावीक मणुष्य मी आहे. विलेनच्या कामाबाबत पंजाबांत मला सारे 'काळा वाघ' म्हणून ओळखतात. विदूर कालचा पोर आहे. कंपणीच्या हिताची गोष्ट म्हनून लिहिनें कीं माझें बी णांव जाड टायपात टाकावें.

आपला णम्र,
**एस. णीलकांत**
( क्यॉक्टर अेक्टर )

**११ ]**

**मच्छर, दाणी आणि सन्स**
ॲडव्हर्टायजिंग एजंन्टस्, मुंबई ता....१९३५

**मालक, अजीब चित्राफोन यांस—**

कुमठेकर यांना जरी नालायक म्हणून आपण काढून टाकलें, तरी त्यांच्या ऑर्डर्सप्रमाणें आम्हीं जाहिरात केलेली आहे. त्यांनीं पांच हजारा-वरचें कमिशन आधींच घेतलें होतें; तरी तितक्या जाहिराती आपण देणें जरूर आहे. आतांपर्यंत सुमारें चार हजारांचें काम झालें आहे.

आपण पाठविलेलीं सगळीं नांवें छापण्यासाठीं सर्व वर्तमानपत्रांत फुलपेज देणें प्राप्त होतें. त्याच कारणासाठीं पिक्चरचें व कंपनीचें नांव

छापण्यास कोठेंही जागा उरली नाहीं. यापुढें आपल्या हुकमाप्रमाणें फक्त पिक्चर व कंपनीच्या नांवाची जाहिरात होईल.

आपले इमानी
**मच्छर, दाणी अँड सन्स.**

**१२ ]**

**'टिमकी'** ता....१९३५ मधील कांहीं उतारे:—

असें समजतें, कीं काल रोजीं कामगारांचे पगार 'चुकते करून' अजीब चित्राफोननें दारें बंद केलीं. जाहिरातीही बंद झाल्या आहेत. वृत्तपत्रीय प्रामाणिकपणाला अनुसरून योग्य वेळीं आम्हांला वाटलें तेंच केल्यानंतर आतां म्हणण्यास हरकत नाहीं, कीं **'अजीब कां हो बंदचि पडली। जाहिरात कां तिजला नडली॥'**

* * *

कर्णपिशाच्च सांगतें, कीं अजीब चित्राफोनचे 'माजी' म्यानेजर श्री. कुमठेकर नवीन कंपनी काढीत आहेत. 'ब्रेव्हो' कुमठेकर–मात्र हीरोला सांभाळा!

* * *

**एक तक्रार**

श्री. टिमकीकार यांस, खालील अत्याचाराचा विचार करावा. अजीब चित्राफोनच्या पार्श्वसंगीतांत मीं लोखंडी त्रिकोण वाजविली असून माझें नांव जाहिरातींत......इ. इ. इ.

———

# बायकांची व्यायाम शाळा ७

'लेडीज फिटनेस सेंटर.' (कंसात बायकांची व्यायामशाळा) ही पाटी पाहून वाटसरू येथून जीव मुठींत घेऊनच पुढें जायचे. त्या फाटकाची नक्षीदार जाळी मागें पत्रे ठोकून बंद करण्यांत आली होती. पत्रे व तट्टये लावून आंतील लहानशी बखळ आडोशी केलेली होती. त्या तटबंदी-जवळून जातांना आंतील धापा फार तर ऐकूं याव्या, एरवीं रस्त्याची चाहूल त्या जागेला फारशी लागूं नये इतपत सोय केलेली दिसत होती. आणि फाटकावर ती धोक्याच्या सूचनेवजा पाटी होती.

बायकांखेरीज त्या फाटकांतून सुकुमार, फिकट, रडकीं पोरें किंवा बिनधोक म्हातारे बाहेर पडले असते, तर कोणाला कांहीं वाटलें नसतें. पण एक दिवस त्या रस्त्यानें जातां जातां सहज पाहतों, तों आपला बन्या त्या फाटकांत चिडलेल्या मुद्रेनें डोकें खाजवीत उभा! शर्ट व शॉर्ट या पेहेरावाबरोबरच त्याच्या हातांत त्या दिवशींचा 'ज्ञानप्रकाश' होता. तेव्हां बन्याला थोडें बरें वाटावें म्हणून मीं म्हणालों,

"तुझं कार्यक्षेत्र दिवसेंदिवस विस्तृत होत चाललेलं दिसतं—"

कार्यक्षेत्राचें काय झालें तें बन्यानें हलक्या आवाजांत पण ग्राम्य भाषेंत व्यक्त केलें.

इतक्यांत एक प्रशस्त बाई कपाळाला आठी घालून नाक उंचावून फाटकापुढून गेली. तिच्या मागोमाग एक जून होऊन वाळलेली टळक दातांची कुमारिका आपल्या चष्म्याच्या भिंगांची विजयी चमक आमच्या दिशेला दाखवून गेली; बंड्यानें शिवीगाळीच्या लवंगी फटाक्यांची आणखी एक सर (आपल्या आंतल्या आवाजांत) उडवली. नंतर त्यानें माझ्या-कडे पाहिलें.

"तूं असायचासच नेमका माझ्या फजितीच्या वेळीं—"

" मागच्या वेळेस तर तूं खुशींत होतास. तुझं तें पेन्शनर्स बोर्डिंग कां काय तें जोरांत चाललं होतं न ?"

" गेलं जहन्नममधें तें बोर्डिंग."

" म्हणजे प्रेमनिराशेचा इतका तीव्र परिणाम झाला तुझ्या मनावर ?"

" कुठली प्रेमनिराशा ?"

" ती रावबहादूर नाफड्यांच्या नलीविषयीं ?"

" हाः ! ती फार जुनी गोष्ट—"

" मग नुकतंच कांहीं झालं वाटतं ?"

" मोठं पुराण आहे तें—ऐकतोस कां ? आतां मलासुद्धां कांहीं काम नाहीं."

ओरडून समोरच्या हॉटेलवाल्याला दोन कप चहा सांगून व हिसक्यासरशी ' बायकांच्या व्यायामशाळे 'ची पाटी खिळ्यासकट उपटून बन्या म्हणाला,

" चल आंत बसूं..."

* * *

" मी प्रेमनिराशेमुळें चिडलों अशी तुझी समजूत झाली असली तर ती चुकीची आहे " बन्या चहा घेत संथपणें सांगूं लागला, " मी कलावन्त असल्यामुळें—"

" थांब थांब, काय म्हणालास ? कलावन्त ?"

" होय, मी कलावन्त आहे हें मला नुकतेंच कळलें. प्रो. कवडे मला म्हणाले कीं, तुमच्या भरमसाटपणांत कलावन्ताची स्खलनशीलता दिसून येते—"

" लगेच पाठ केलंस वाटतं हें ?"

" लिहूनच घेतलं ना त्यांच्याकडून !"

" केवढ्याला ?"

' एका यथास्थित जेवणाच्या मोबदल्यांत. शिवाय या बायकांच्या व्यायामशाळेंत ' व्हिजिटर' म्हणून यायची देखील त्यांना सवलत दिली होती न ?"

“ प्रेमनिराशेबद्दल काय म्हणत होतास ? ”

“ मी कलावन्त असल्यामुळें प्रेमनिराशा माझ्यावर पावलोपावलीं येतात पण त्यांच्यामुळें माझ्या व्यवहारावर परिणाम मी होऊं देत नाहीं— पण पहिल्यापासूनच सगळं सांगतों तुला–” बन्यानें कप खालीं ठेवून सुरवात केली.

+ + +

नाफड्यांच्या नलिनीनें जरी माझी तात्पुरती निराशा केली, (बन्या म्हणाला) तरी ‘ निवृत्ति–निवास ’ कांहीं दिवस खूप जोरांत चालत होता; आणि त्या खुशींत मी माझं मन जं थोडं उदार होऊं दिलं–तें मला नडलं. पेन्शनरांच्या जिवाला थोडा विरंगुळा म्हणून मी औदार्याच्या त्या कैफांत-तमाम पुरुष नोकरवर्ग बदलून ( चाळीस वर्षांवरील वयाच्या ) दायामोल-करणी पेन्शनरांच्या तैनातीस दिल्या...आणि लवकरच ती अभिनव-संस्था बंद पडली.

नंतर काय करायें या विचारांत मी कांहीं दिवस एक ‘ कॉम्पिटिशन ब्यूरो ’ काढून पाहिला; पण दहा हजाराचें पहिलें बक्षिस मिळालेला इसम तें खरोखरच मागायला आल्यामुळें माझा ब्यूरो बंद पडला. त्याला दुसऱ्या दिवशीं चेक देतों म्हणून सांगून मी तडक कोंकणांत निघून गेलों. कॉम्पिटिशन ब्यूरो ‘ भोलासिंग ’ या नांवाखालीं काढून, त्या दिवसांत भव्य दाढीमिशा राखण्याचीही खबरदारी मी घेतल्यामुळें, सफाचट केलेल्या उजळ तोंडानें कोंकणांतून परत येण्यास मला फार दिवस लागले नाहींत.

परत आल्यावर पुणें शहरांतील एकंदर परिस्थितीचा विचार करून मी ठरविलें कीं, आपल्या सुखवस्तू वर्गाच्या सहकार्यानें आपल्याला इभ्रतदारपणें एक नवा उपक्रम करण्यास हरकत नाहीं. खाऊनपिऊन सुखी असलेल्या कित्येक महिलांना व्यायामाची जरूर आहे हें मला आढळून आलें. शरीर तरुण असावें असें कित्येक प्रौढ स्त्रियांना मनांतून वाटत असावें अशी मला दाट शंका होती. ‘ कन्याकौशल्य क्लासा ’च्या प्रिन्सिपालबाई जोरबैठका काढीत असल्याचें मीं ऐकलें होतें. एक डॉक्टरीण व्यायामासाठीं पहाटे पळत सुटते अशी कुणकुण मला

लागली होती. टेनिस खेळण्याचा हताश प्रयत्न करणाऱ्या कित्येक जून व अरबूज अबला माझ्या नजरेसमोर होत्या.

लौकरच जनू जोगदंडाची बखळ घेऊन मी तिच्यांत जरूर त्या सुधारणा केल्या, व वर्तमानपत्रांतून (व हँडबिलें घरोघर पाकिटांत बंद करून टाकून) एक जाहिरात दिली:—

'शरीर तरुण तर मन तरुण. सिनेमांतल्या बायकांकडे पहा, कित्येकींच्या घरीं नातवंडे खेळत असतील, पण अंगांत चपळाई किती! साहेबांच्या बायका पहा, पन्नास वर्षांच्या असल्या तर पंचविशीच्या दिसतात. पुरुषांना अशा बायका किती आकर्षक वाटतात याचीं उदाहरणें आपल्या-भोंवतीं आहेतच. तेव्हां आपणही तशा कां होऊं नये? **सुदृढ प्रकृति हेंच खरें सौंदर्य होय! तारुण्य आपल्या हातीं आहे!** स्थूल स्त्रियांना सडसडीत करणारी, कृशांगीला पुष्ट करणारी एकच संजीवनी आहे-व्यायाम! सुस्थितींत राहणारांना आशेचा एकच संदेश, संपन्न लोकांची एकच आरोग्यदायक करमणूक, व्यायाम आहे.

**—लेडीज फिटनेस सेंटर.**

(बायकांची व्यायामशाळा.)

उच्च दर्जाच्या वरिष्ठ मध्यमवर्गांतील स्त्रियांसाठीं.

लिहा अगर भेटा.

\+ \+ \+

माझ्या कल्पनेला लौकरच यश आलें. मी व्यवस्था साहेबी फॅशनची ठेवली होती. व्यायामशाळेच्या तमाम मोलकरणींनीं सर्व मेंबर बायांना 'साहेब' म्हणावें हा मी कडक नियम केला होता. (पुढें संवयीमुळें या मोलकरणी एकमेकींनादेखील बाईसाहेब म्हणूं लागल्या.) त्यांना 'आयाह्' म्हणून हांक मारल्यास 'येस मेमसाब' म्हणा-यला शिकवलें होतें. त्यामुळें सेंटरच्या सभासदत्वाला थोडें चढाओढीचें स्वरूप आलें होतें. 'जास्त पैसे देणारांना कमी श्रम' या तत्त्वावर मीं लठ्ठ लठ्ठ श्रीमंतिणींसाठीं एक कॅरमरूम देखील ठेवली होती. त्यांत दोघी-चौघी अजगरासारख्या लोळत असायच्या–त्यांनीं सडपातळ होण्याची

आशा सोडून दिली होती. पण आकर्षक आकृति बनविण्याच्या आकसानें येऊन घामाघूम होणाऱ्या बऱ्याचजणी होत्या. त्यांच्या समजुतीखातर मी एक पारशी ड्रिलमास्तरीण त्यांना फॅन्सी अंगविक्षेप शिकविण्यासाठीं ठेवली होती. ती पण हौशी होती; तिनें या मध्यमवयस्क व लठ्ठबारीक बायकांचे कित्येक व्यायाम संगीताच्या चालीवर बसवले होते.

व्यायामानंतर तोंड धुण्यास एक खोली मोठमोठे आरसे लावून बनविली होती, व तेथेंच कपडे बदलण्याची सोय होती. व्यायामाचा आपल्या शरीरावर इष्ट तो परिणाम होतो आहे कां नाहीं हें मेंबर-बायांना तेथें पाहतां येत असे. बायकांमध्यें आपापसांत संकोचाचें कारण नसल्यामुळें स्वतःबरोबर इतर बायकांचीहि प्रगति तेथें पाहतां येत असे—आणि त्यामुळेंच तेथें नेहमीं तक्रारी व्हायच्या. बेढब देहांकडे थोड्या कमी बेढब देहांनीं कुत्सित दृष्टीनें पहावें, व असूयापूर्ण कृश देहांनीं पुष्ट देहांबद्दल कुचेष्टेचे उद्गार काढावेत हें अगदीं साहजिक होतें. एके दिवशीं मात्र गोष्ट विकोपाला गेली. आरसेमहालांत एकाएकीं मोठा गलबला होऊन दोन विवस्त्र स्त्रिया भांडत बाहेर आल्या. कपडे बदलतां बदलतां एकमेकींच्या घेराबद्दल गोष्ट निघून प्रकरण खडाजंगीवर गेलें होतें—इतकें कीं कपडे बदलण्याचें मध्येंच विसरून त्या तणतणतच बाहेर पडल्या होत्या. पण बायकांची तालीम झाली म्हणून निःसंकोच वागण्याला कांहीं सीमा आहे कीं नाहीं? मी पुरुष तेथें आहे हें त्या विसरल्या; त्या भीषण दृश्याच्या क्षणैक दृष्टिक्षेपानें मला चक्कर आली—निदान यावेळीं तरी दोन्ही डोळे झांकून तसें ढोंग करणें अत्यंत मुत्सद्दीपणाचें आहे हें मी ओळखलें—व 'फेंट' झालों. त्या स्त्रियांची समजूत घालून त्यांना परत आरसेमहालांत ढकण्यांत आलें, व डोळे मिटून पडल्या पडल्या आरसेमहालांत 'पार्टिशन्स' घालून वेगवेगळ्या खोल्या केल्यास काय खर्च होईल हा मनांतल्या मनांत मीं हिशेब करूं लागलों. इतक्या हौसेनें ते आरसे मी तेथें लावले खरे, पण ते बायकांच्या कपडे-पटाचा आखाडा बनवून प्रौढ बायकांना कुस्तीला प्रवृत्त करतील ही मला काय कल्पना? (त्या आरसेमहालाजवळच्या अडगळीच्या खोलींतून, मधल्या दाराला भोंक पाडून पाहूं देण्यासाठीं गांवांतल्या एका कर्जबाजारी सरदारानें

मला एक पांचशें रुपयांची आंगठी देऊं केली होती, पण ती हीन देणगी मी स्वीकारली नाहीं–शिवाय त्या बायकांना जरा का संशय आला असता तर त्या जहागिरदाराला नि मलाहि कच्चा खाल्ला असता त्यांनीं.)

माझ्या खुर्चीवर मी मूर्च्छित पडलों असतां कोणीतरी ओला हातरुमाल माझ्या कपाळावर ठेवला, कांहीं रुक्ष बोटें माझ्या गालावरून उतरलीं. मी डोळे उघडून ताडकन् उठून बसलों–बघतों तों ती मघां आपल्या पुढून गेलेली चष्मेवाली हस्तीदंती !

मित्रा, ती बाई जर कधीं तुझ्याशीं ओळख करायला आली तर माझ्या दोस्तीदाखल एक काम कर, कमरेचा पट्टा काढून तिच्या आसनावर दोन फटके ओढ. त्या बयानें माझी सोन्यासारखी व्यायामशाळा बंद पाडली. त्या लुडबुड्या उंटिणीनें माझा तंबू कोसळून पाडला. भिडस्तपणाच्या एका बेसावध क्षणाला मी तिच्या पागलपणाला बळी पडलों.

"कसं वाटतं आहे आतां ?" ती आपल्याकडून मोठ्या मंजुळ आवाजांत म्हणून म्हणाली–पण मला मात्र पाटीवर खिळ्यानें रेघ ओढल्यासारखे ते शब्द ऐकूं आले. झिणझिणलेल्या अंगानें मी उभा राहिलों.

"हें काय, बसा न जरा, थोडी विश्रांति घ्या–" ती माझ्या खांद्यांना धरून मला परत खुर्चीवर बसवीत म्हणाली. मीं हलकेंच तिचे हात दूर करून खालीं बसलों.

अर्धवट शिकून शाहण्या झालेल्या भुक्кड स्त्रियांचा जो वर्ग आपल्या समाजांत फैलावूं पाहतो आहे त्या वर्गाची रेवती वांबोरकर ही–ती आतांची–बया आहे. हिचं लग्न झालं आहे कां नाहीं तें मीं विचारलं नाहीं पण तिच्या वागणुकीवरून तरी तें झाल्यासारखं दिसत नाहीं. गोल नेसून पुरुषांत धीटपणें हिंडलों कीं मोठी शिकार मारली असं या बायकांना वाटतं कीं काय कोण जाणे. दिसते मात्र अशी कीं, जणुं काय एखाद्या तेलकट दीपमाळेला अष्टपुत्र्या गुंडाळल्या आहेत. विणकामाच्या शिकवण्या देण्यापासून बिनकामाचीं रडगाणीं गाण्यापर्यंत नी विमाकंपनीच्या दलालीपासून लॉटरीचीं तिकिटें खपविण्यापर्यंत सर्व धंदे या बाया आतां करायला लागल्या आहेत. मीं बायकांची व्यायामशाळा उघडल्याच्या

दुसऱ्या दिवशीं ही अफलातून आफत, बदसूरत बला माझ्या दारांत उभी! कुठल्याशा गटार वर्तमानपत्राची दलाली करायला आली होती जाहिराती-साठीं. डोकें दुखेपर्यंत बडबडली, मी चिडून जितका गप्प बसलों होतों, तितका तिला अधिक चेव येत होता. आपण किती कर्तबगार आहोंत, वाटेल तिथें कसे जातों, आपल्या मोठमोठ्या लोकांशीं कशा ओळखी आहेत, धंद्यासाठीं संकोची वृत्ति कशी सोडली पाहिजे, अशी अनेक चऱ्हाटं वळ-लीन् तिनं—मला वाटतं तिच्या पातळावर जाहिराती छापून तिला रस्त्यांतून कमिशनवर हिंडायला सांगितलं असतं तर ती खुषीनं हातांत घंटा घेऊन हालवीत गांवभर फिरली असती.

एरवीं या बाईला मी शक्य तितक्या सभ्यपणें हांकून दिली असती पण माझ्या दुर्दैवानें ही बया बसली होती त्याच वेळीं माझी एक नवी आलेली मेंबरीण—कमळाबाई कातवडे नांवाची एक कंत्राटदाराची बायको—ऑफिसांत उपटली. मघा त्या हिडिंबेच्या आधीं नाक फेंदारून जी पांढरी म्हैस गेली तीच ती. तिचें नांव द्यायची लालूच दाखवून तालमीला एकादी लठ्ठ देणगी उपटण्याचा विचार मी करीत होतों. कर्मधर्मसंयोगानें या मुर्दाड रेवतीची व तिची ओळख निघाली. ही कळकट कटकट माझ्या टेबलाजवळून उठून कमळाबाईच्या भोंवतीं शेपूट हालवीत घोंटाळायला लागली. त्या कंत्राटदारणीला स्तुतीची आवड नसली तरच आश्चर्य! या रेवतीच्या गोंडा घोळण्यानं ती खुलली आणि—आधींच फार नाजुक ती—एकाद्या सूर्यकमळासारखी माझ्या बाजूस वळली. परिणामीं रेवती वांबोरकरला ऑफिसच्या कामासाठीं सेक्रेटरी म्हणून ठेवून घेणं मला भिडेखातर भाग पडलं. मात्र ही जागा बिनपगारी आहे हें स्पष्ट करण्याची खबरदारी मी वेळींच घेतली.

आणि तेव्हांपासून माझ्या मानगुटीं ही अवदसा बसली. संध्याकाळीं दोन तास हिशेबाचं काय तें काम करून रस्ता पकडण्याचं सोडून, ती मिळेल तो वेळ माझ्याभोंवतीं घालूं लागली. रस्त्यांत भेटली कीं माझ्याशीं लगट दाखवूं लागली—माझ्या जवानमर्द मित्रांत मी हांसण्याचा विषय होऊं लागलों. ऑफिसांत माझ्या टेबलावर ती जास्वंदी, गुलबक्षी नी सदाफुलीचे

गुच्छ ठेवूं लागली. व्यायामशाळेंतल्या त्या बथ्थड बायकांदेखील आमचें कौतुक करीत असल्याचीं भेसूर चिन्हें दिसूं लागलीं. मला स्वतःला मात्र बाहेर शक्य तितकें फटकून वागून, आंतल्या आंत सात्त्विक संतापानें जळण्याखेरीज कांहीं मार्ग उरला नव्हता.

आरसेमहालांतल्या त्या लठ्ठ बायकांच्या साठमारीच्या दिवशीं मात्र या बयानें, मला ऑफिसांत असहाय स्थितींत गांठून माझा गळा कापायची वेळ आणली होती.

" तुम्ही जा आतां हवं तर, " मीं कठोरपणें म्हटलें.

" हें काय असं ? तुम्ही आपल्या प्रकृतीची फारच हेळसांड करतां !" ती लाडिक रुसव्यानें (!) म्हणाली.

" मला कांहीं होत नाहीं—तुम्हीं तें भांडण बंद केलंत कां जाऊन ?"

" त्यासाठींच तुम्हाला मी विचारायला आलें होतें, कमळाबाई रागावून घरीं गेल्या, "

" लुगडं नेसून गेल्या न ?"

" इश्श ! काय फाजिलपणा !—त्या म्हणाल्या कीं, पाय ठेवणार नाहीं तुमच्या व्यायामशाळेंत कधीं. "

हे मात्र विचार करण्यासारखे शब्द होते. काय करायचें या विचारांत मी पडलों आणि त्याच मनःस्थितींत असतांना या अशक्त हिडिंबेनें आपला बेत माझ्या गळ्यांत बांधला—त्या बेतामुळेंच आज ही व्यायामशाळा बंद पडली आहे.

रेवती वांबोरकरचा बेत थोडक्यांत असा, कीं कन्त्राटदाराच्या बायकोची ज्या सावकारणीशीं जुंपली होती, त्या सावकारणीवर मात करांण्यासारखी कन्त्राटदारणीला संधि मिळाली तर ती व्यायामशाळेकडे पुन्हआवडीनें वळेल—इतकेंच नव्हे तर व्यायामशाळेसाठीं एखादा आंकडादेखील टाकील. पण तिच्यामध्यें असा हृदय—पालट घडवून आणण्यासारखी संधि कोणती ? त्यासाठीं रेवतीचा बेत असा होता कीं, कुठून तरी पोहण्याचा मोका आणावा. सावकारणीला पोहतां येत नसल्यामुळें ती

नामोहरम होईल व कन्त्राटदारणीला पोहतां येत असल्यामुळें तिचा नैतिक विजय होईल. तिला पोहतां कसें येतें या प्रश्नावर रेवतीनें खुलासा केला कीं ती लहानपणीं कुठल्याशा क्षेत्रस्थ भिक्षुकाची उनाड पोर होती व कन्त्राट-दारानें तिच्या बापापासून तिला ( सवतीवर ) विकत घेतली होती. ( सुदै-वानें ही सवत लौकरच मेली होती. ) तेव्हां, कमळाबाईच्या कुंवारपणाला जरी वीस वर्षें लोटलीं असलीं तरी पोहण्याची कला मनुष्य विसरत नसल्या-मुळें, सावकारणीचा ' दिपेट ' करण्याचा ' चानस ' त्या कन्त्राटदारणीला आणून देणें ही मुत्सद्देगिरीची परमावधि होणार होती.

' भीक घे पण भोकूं नको ' म्हणून रेवतीच्या आचरट बेताला मी कंटाळ्यानें होकार दिला. तयारी तिच्यावरच सोंपवली. मला वाटलं हिच्याच्यानं कांहीं विशेष होणार नाहीं. कमळाबाईची फार तर आपण स्वतः समजूत घालूं. पण तीनचार दिवसांतच रेवतीनें येऊन सांगितलें कीं संगमाजवळ नदीकांठीं एक बंगला रिकामा आहे त्याची बाग नदीच्या पाण्यापर्यंत गेलेली आहे. तेथें एक दिवस उघड्या हवेंत व्यायाम, अल्पो-पहार, पोहणें वगैरे कार्यक्रम ठेवावे म्हणजे आपला व्यूह फलद्रूप होईल. त्याप्रमाणें पांच रुपये वर्गणी ठेवून मी वनविहाराच्या कार्यक्रमाची नोटीस लावली व सुमारें वीस बायका येण्यास तयार झाल्या.

* * *

आम्ही एक मोटारलॉरी करून संगमाजवळच्या त्या बंगल्यांत गेलों. त्या बंगल्याच्या मागची हिरवळ अगदीं नदीच्या पाण्यापर्यंत उतरत गेली होती. भोंवताली दाट झाडी असल्यामुळें निर्धास्त मोकळेपणा वाटत होता— हें त्या बायकांच्या वागण्यावरून ताबडतोब कळून आलें. बंगला रिकामाच होता व त्याच्या माळ्याला मीं चिरीमिरी देऊन खुष केला होता. आपण आतां जगाच्या डोळ्यासमोर नाहीं हें लक्ष्यांत येतांच त्या बायका चांग-ल्याच उंडारल्या. लॉरी सुरू झाल्यापासून त्यांना स्वातंत्र्याची बेहोषी आली होती--त्या सिनेमांतलीं द्वंद्वगीतें कोरस करून म्हणायला लागल्या होत्या ! नदीकांठच्या त्या हिरवळीवर उतरल्यावर ( व सुरवातीलाच अर्धा—अर्धा शेर दूध ढोंसल्यावर) त्या पांढरपेशा मध्यमवयस्क बोजड बायका भलत्याच

खुर्चीत आल्या. निसर्गाच्या रमणीय पडद्यापुढें आपल्या जुन्या तारुण्याचीं सोंगें त्यांच्या अंगांत संचारलीं. त्या उडत पावलांनीं चालूं लागल्या, एकमेकांना ढकलूं लागल्या. कित्येकजणींनीं लंगडी, शिवाशिवी, बेडुकउड्या वगैरे खेळ सुरू केले. 'कन्या कौशल्य क्लास'ची चष्मेवाली प्रिन्सिपॉल चिंचेवर चढली, कंत्राटदारीण एकदोघींना बरोबर घेऊन आपल्या ड्रिलची प्रॅक्टीस करूं लागली. त्या ड्रिलच्या तिसऱ्या पवित्र्याकडे मीं चकित होऊन पहात होतों. (उजव्या पायाची टांग पुढें टाकून डावा हात छातीसमोर फेका, त्याचवेळीं डावा पाय शक्य तितक्या मागें घेऊन, उजवा हात उजव्या बरगडीजवळ मूठ वळून घट्ट धरून ठेवा. हाच पवित्रा उजव्या डाव्यांची अदलाबदल करून घ्या. हे दोन्ही पवित्रे आळीपाळीनें घ्या. दृष्टि समोर, तोंड बंद, मान ताठ, नाकानें खोल श्वासोश्वास.)

ज्यांची 'तनु कुसुमफुलांची छडी' राहिली नाहीं अशा भरीव व गंभीर बायकांना हा व्यायाम करतांना पाहून कोण मंत्रमुग्ध होणार नाहीं? एरवीं शेरशेर सोनें व उंची लुगडीं परिधान करणाऱ्या त्यांच्या माजलेल्या शरिरांना, एका पांचवारी गोल नळकांड्याचा काचापदर बांधून, घामाघूम होईपर्यंत हातपायांची हालचाल करायला लावणारा मी, निःसंशय एक समाज-सुधारक आहे असा विनयपूर्ण विचार माझ्या डोक्यांत येऊन गेला. त्या स्त्रियांचीही मला एकप्रकारें करुणा आली. अंगमेहनत करणाऱ्या बायांनीं अंगांतल्या रगीनें साहजिकपणें जखडून ठेवलेलें तारुण्य, मेदानें अकालीं वृद्ध झालेल्या या सुखवस्तु बापुड्यांना मिळूं नये, या विचारानें मन विषण्ण झालें. खरोखर हा दैवदुर्विलासच नव्हे काय, कीं—

इतक्यांत मोराच्या पायासारखा एक हात माझ्या हातावर पडल्या-सारखें वाटलें. पोटांत एकदम खड्डा पडल्यासारखें वाटून मीं वळून पाहिलें. वळतावळतांच माझ्या मनांत येऊं नये तें आलें—

"तुम्ही चला ना लपंडाव खेळायला—"

ती अर्थातच रेवती वांबोरकर होती. पण ती आज इतकी नटली होती कीं, 'रेवती वांबोरकरीण' हेंच नांव तिला जास्त शोभलें असतें. तिनें आपल्या तुटपुंज्या केसांत दोन (वेगवेगळ्या रंगांच्या) गंगावनांची भर

घातली होती. कानांत दोन टिनपाट इअरिंग्ज घातलीं होतीं, तिच्या दुबोटी लाकडी कपाळावर पावडरचा रंग वेगळा दिसत होता, तिनें भुवया कापून गोल करण्याचा प्रयत्न केला होता, डोळ्यांत काजळ घातलें होतें. तिचा गळा व हात एखाद्या चावडीसारखे उजाड दिसत होते, तिच्या पायांत उंच टाचांच्या सॅन्डल्स होत्या, नि झाडाला गुंडाळून वाळत घातलेल्या चिरगुटा-सारखें भडक काळ्या नक्षीचें एक पांढरें पातळ तिच्या आवळकाठी अंगावरून वाहवत होतें—शिवाय चष्मा होताच.

एखाद्या सभ्य स्त्रियांच्या व्यायामशाळेवरील सुपरिंटेंडंटला शोभेल अशाच कठोरपणें, मी लपंडाव खेळत नाहीं म्हणून या लडिवाळ स्त्रीला सांगितलें.

"आज आपला बेत नक्की पार पडेल अशी एक युक्ति मला सुचली आहे," ती म्हणाली.

ती युक्ति अशी कीं, जवळून एक बोट भाड्यानें घेऊन चार–चार जणांनीं मिळून पांच पांच मिनिटें जलविहार करून यायचें, शेवटच्या फेरीला त्या बोटींत कन्त्राटदारीण, सावकारीण, रेवती व मी इतक्यांनीं बसायचें—

मी साफ बसणार नसल्याचें नमूद केलें, "मग मीही नाहीं जाणार." ती मूर्ख पोरगी फणकाऱ्यानें म्हणाली, "असं चौघांनीं जाऊन बोट एकदम उपडी करायची, मग कन्त्राटदारीण सावकारणीला वांचवील नी मला—"

मी तेथून निघून गेलों; व याप्रमाणें त्या युक्तीविषयीं तीव्र निषेध व्यक्त केला.

तथापि इतर बायकांच्या आग्रहानें मीं जलविहाराची जरूर ती व्यवस्था केली. चौघीचौघींच्या टोळ्या पांचपांच मिनिटें नदीवर जाऊन आल्या. अखेरच्या फेरीला त्या दुष्ट रेवतीनें स्वतः ठरविलेलींच माणसें ठरलीं. मला पोहतां येत नाहीं म्हणून मीं जाण्याचें नाकारलें. व्यायाम-शाळेच्या सुपरिंटेंडंटला पोहतां येत नाहीं या बोलण्यावर त्या बायांनीं विश्वास ठेवण्याचेंही साफ नाकारलें. मी त्या पाण्याजवळच्या लहानशा धक्क्यावर उभा राहून एकेक बाईला होडींत बसण्यास मदत करीत होतों. कंत्राट-दारीण बसली, सावकारीण बसली, रेवती बसायला जाऊं लागली; तिला माझा हात धरून उतरूं देणें प्राप्तच होतें. तेवढ्यांत त्या बेअकली पोरटीनें

वळून माझ्याकडे पाहिलें, बसतांना तिचा हटकून तोल गेला, तिला साव-रीत असतां एकाएकीं माझा हात धरून त्या कैदाशिणीनें मला ओढलें !—बोट एकदां हेलकावून उलटली, त्या तीन बायांच्या समवेत नदीच्या पाण्यांत मी गटंगळ्या खाऊं लागलों.

वास्तविक तिथें पाणी छातीइतकेंच होतें. पण आम्हांला हा शोध फार उशिरां लागला; दरम्यान मी पहिल्या खेपेला डोकें वर काढलें तोंच 'वांचवा' असें गुडगुडत ओरडून रेवती मला मगरमिठींत पकडूं लागली. अशा वेळीं बुडणाऱ्या माणसाच्या थोबाडींत देणें श्रेयस्कर असतें हें मी एकदां वाचलेलें होतें. तें आठवून तो प्रयोग रेवतीच्या गालावर मी तेवढ्या आणीबाणीच्या प्रसंगीं पण अगदीं झणझणीत केला. लगेच मी दुसऱ्यांदा खालीं गेलों. आतां फक्त एकदांच वर येणार हा विचार माझ्या डोक्यांत आला व पाण्यावरच्या या शेवटच्या सफरीलाच जीव बचावण्याचा कसून प्रयत्न करायला पाहिजे हें मी ठरविलें. पण मी तिसऱ्यांदा वर येतों तों एकाद्या पाणघोड्यासारखी ती कंत्राटदारीण माझ्यावर चाल करून आली. ती माझें बकोटें धरण्याचा प्रयत्न करीत होती. तीही बुडत असावी हें पाहून तिच्याही श्रीमुखावर मी आपला 'तात्का-लिक उपाय' केला. इतक्यांत 'पाय टेका ! पाय टेका !' अशी हाकाटी ऐकूं आली व आम्ही चौघेजणें कमरेइतक्या पाण्याखालच्या चिखलांत पाय टेकले. लौकरच आम्हांला कोरड्या जागेपर्यंत ओढून घेण्यांत आलें.

"यांनीं मुद्दाम केलं हें" इतका वेळ एका अक्षराचीहि तक्रार नसलेली सावकारीण म्हणाली. मी स्तंभितच झालों.

"यांचं ठरलेलंच दिसत होतं संगनमत्त," कंत्राटदारणीनें आपल्या वैरिणीला दुजोरा दिला ! लौकरच सर्व बायका आपापसांत कुजबुजूं लागल्या. ( नंतर मला कळलें कीं कंत्राटदारीण नदींत माझ्याजवळ जी येत होती ती बुडत होती म्हणून येत नसून मी बुडत असेन म्हणून वांचविण्यासाठीं येतहोती. ) शेवटीं एका बाईनें स्पष्टच म्हटलें कीं, यांचं त्या पोरीशीं मेतकूट म्हणून आमच्या जीवावर कशाला उठावं बाई ?

या अन्यायानें मला मनस्वी संताप आला. मी चिडून ओरडलों, "बायांनों, तुम्ही माझ्यावर वाटेल तो आरोप करा—तुम्हांला नदींत बुडवून

मारण्याचा प्रयत्न केल्याची फिर्याद करा (तुम्हांला एकदां पाहिल्यानंतर तो प्रयत्न फसला म्हणूनच कोर्ट मला शिक्षा देईल) पण या–या–या बयाशीं मेतकूट आहे असं मात्र म्हणूं नका. तुमची परवानगी असेल तर या क्षणाला तिला तंगडी धरून त्या नदींत भिरकावून देतों."

एकाएकीं त्या बायकांना रेवतीचा विलक्षण पुळका आला– 'बिचारी,' 'गंमत केली, आतां कंटाळले!' 'फसवलं असेल मेल्यानं,' अशी उघडउघड कुजबूज सुरू झाली. परत नदींत उडी घ्यावी कीं काय हा विचार माझ्या डोक्यांत आला–इतक्यांत एक भारी मोटर त्या बंगल्यामागें येऊन उभी राहिली. त्या गाडींतून एक चिडलेला वाणी उतरला. बायकांबद्दल यत्किंचितही दाक्षिण्य नसलेली भाषा वापरून 'ए हा बंगला तुमच्या बापच्या माल हाय काय?' असा स्वच्छ सवाल त्यानें बायकांना टाकला.

तो त्या बंगल्याचा मालक होता. बंगला बंद असून सुद्धां [किंवा होता म्हणूनच] एकांताच्या आशेनें तो मुंबईहून [कुणालासा घेऊन] आला होता. आपल्या खाजगी निसर्गसौंदर्यावर आडदांड गरती बायकांनीं विनाकारण धुमाकूळ घालावा हें त्याच्या वृत्तीस पटण्यासारखें नव्हतें. आणि हें मत त्यानें अगदीं तुटपुंज्या मराठींत पण परिणामकारक रीतीनें व्यक्त केलें. स्वतःपेक्षां अधिक श्रीमंतीचें वाजवी दूषण घेऊन, त्या सुखवस्तू पांढरपेशा, वरिष्ठ मध्यमवर्गाच्या वजनदार बायका मुकाट्यानें जाऊन आपल्या लॉरींत बसल्या.

आणि याप्रमाणें 'लेडिज फिटनेस सेंटर' संपला. आज सकाळपर्यंत सर्व बायकांचे मेंबरशिप बंद केल्याचे निरोप आले.'

बोलतां बोलतां विमनस्क मुद्रेनें खालीं पाहणाऱ्या बन्यानें लाथेच्या ठोकरीनें ती 'बायकांच्या व्यायामशाळे'ची पाटी उडवून दिली—आणि एकच डुरकणी फोडून पाय एकदम वर घेऊन तो पायाचा आंगठा कुरवाळीत बसला. अंधार पडला होता. पुणेरी डांस पायांना चावूं लागले होते. पलीकडच्या घरांत कोणाचें तरी मूल रडत होतें...

———

# गाणारा अकौन्टन्ट

८

धोंडोपंत टकले गातात हें ऐकून आम्ही चकितच झालों. म्हणजे आम्हांला तशी कांहीं गोष्ट कधीं ध्यानींमनींदेखील नव्हती. साडेदहा ते आठ हिशेब तपासण्याचें काम करून बाकीच्या वेळांत बायकोमुलांबरोबर ( शक्य तितक्या ) गुण्यागोविंदानें संसार करणारा हा सद्गृहस्थ 'रोज सकाळीं तंबोरा घेऊन बसतो' ही बातमी आम्हांला खरीदेखील वाटेना—पण कानोसा घेण्यास हलकेच गेलेला बन्या जेव्हां कानावरचा हात घट्ट दाबून परत पळून आला तेव्हां आमची खात्री पटली. आम्ही थोडे हळहळलोंदेखील ! किती सज्जन मनुष्य, काय बिचाऱ्याला बुद्धि झाली न कळे—असो, देव घेईल त्याची काळजी...

पण सगळें सोडून ही गाण्याची तल्लफ या माणसाला कोठून उपटली ? आपण शेजाऱ्यापाजाऱ्यांत केवढा अनर्थ उडवतों आहों याची त्याला कल्पना तरी असेल कां ? हें चोरटें अंग त्यानें एकाएकीं कसें उघडकीस आणलें ? उद्यां कोपऱ्यावरचा इराणी मॅट्रिकच्या नोटस् लिहितो किंवा केसरी कचेरींत टेनिस क्लब आहे अशादेखील बातम्या यायच्या ! दाबून ठेवलेल्या कलेच्या कळा एकदम अशा बाहेर येतात कीं काय ? कीर्द—खातावण्यांच्या उभ्या आडव्या रेघांच्या चौकटींतून, आंकड्यांच्या मनोऱ्यांमधून, पेन्सिलींच्या लाल—निळ्या—हिरव्या खुणांच्या पताकांखालून, धोंडोपंतांची कावलेली रसिकता निसटून एकाएकीं असा आक्रोश करूं लागली असेल कां ? तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर कदाचित् दारें लावून बुलबुलतरंग वाजविण्याचा अभ्यास करतांनाहि आतां एकादे वेळीं सांपडायचे—काय नेम सांगावा ? एरवीं चांगले लोकप्रिय असलेले लोक एकाएकीं टेनिस शिकायचें ठरवून नाहीं चांगल्या खेळांत विचका करीत ?

पण भोंवतालच्या लोकांचा विचार धोंडोपंताला शिवलेला असेल असें वाटत नाहीं—काय बिचारा घसा फोडून ओरडतो आहे—कदाचित् रडणाऱ्या पोरांचें किंवा दम देणाऱ्या पत्नीचे आवाज मारून टाकायला तर हें जबरदस्त अस्त्र त्यांनीं काढलें नाहीं? बाकी शेजारीं सारखा फोनो लावणाऱ्या वाण्याला मात्र त्यांनीं थंडा पाडला! धोंडोपंत जर संध्याकाळींहि तंबोरा घेऊन बसूं लागले तर रेडिओमधून येणारे बाजारभाव ऐकणारे दुसऱ्या बाजूचे रसिक वाणीहि कमी होतील—पण दरम्यान बाकीच्या निरपराध लोकांची काय वाट? 'आजू-बाजूच्या आवजांपासून स्वतःचा बचाव करायला त्याहीपेक्षां मोठा आवाज स्वत काढणें' ही मुत्सद्देगिरी जरी धोंडोपंत अमलांत आणीत असले—तरी बिन-आवाजी लोकांचा वाली आतां कोण? तथापि तो विचार करायला धोंडो-पंतांना सवड नाहीं. ते चिकार पुकारताहेत—

"तूं कौऽऽऽनरि झ्याऽऽऽवैन ऑऽऽऽऽ" मधून मधून त्यांचा उस्ताद (त्यांनीं एक मामुली खांसाहेब उस्तादहि आणला आहे) घुमतो आहे—

ना धिंधिन्ना तिरकिट धा धा—
धा तिरकिट धा तिरकिट—ढुम!

ऐकत नाहीं गृहस्थ आतां कोणाला. धोंडोपंत दार लावून बसले आहेत म्हणून त्यांचा आवेश दिसून येत नाहीं—पण एकदम दार उघडलें तर जुन्या मनोरंजनांत एकदां आलेल्या 'धृपद् धमार!' या गोष्टींतल्या नायकासारखें रौद्र—स्वरूप धारण केलेलें दिसेलसें वाटतें. व्यायाम उत्तम.

मानवी जिवाला विरंगुळा द्यायला संगीत ही हळुवार फुंकर आहे—कोण बेटा म्हणतो? आमच्या धोंडोपंतांना विचारा—ऐका—

हि हि हि हि हि हि हि हि हि
हॉं हॉं हॉं ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ
हे ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ—

त्या फिरक्या, त्या मुरक्या, त्या बोलताना, त्या हरकती, ते खटके, झटके, रेकले, भुभुःकार—तशी एरवीं आमची हरकत नाहीं, कोणी अक्षरशः मेहनत म्हणून 'गाऊं' लागला तर तो ज्याच्या त्याच्या मग-दुराचा प्रश्न आहे—पण या गाण्यांत अडचण अशी कीं तें ऐकूं जातें. आतां

त्यामुळें स्वतःचीं व आसपासचीं पोरें वचकतात, धुण्याचे आपटवार ऐकूं येत नाहींत वगैरे सगळें खरें—पण त्यासाठीं केवढा हा धांगडधिंगा ? संगीत कलेंत ताकदीची जरूरत अवश्य आहे—पण ती दम टिकविण्यासाठीं, हलकल्लोळ उडविलाच पाहिजे असें नाहीं. संगीत हें गोड असावें असा साधारणपणें लोकप्रवाद आहे—तें नुसतेंच शास्त्रशुद्ध आणि तालबद्ध असून भागत नाहीं—नाहीं म्हणजे काय, सामान्य माणसांचा निव्वळ गवई—गाण्यानें मुडदा पाडून टाकतां येतो ! आवाजाची गोडी, सुरेलपणा, भावना वगैरे कोमल पानें फुलें ओरबडून टाकून शास्त्राचें खोड श्रोत्यांच्या डोक्यांत हाणणाऱ्या पंथांत धोंडोपंत सामील झालेले दिसतात.

यांना एकाएकीं हा झटका येण्याचें कारण तरी काय ? प्रत्येक माणसांत जो 'जेकिल आणि हाइड' असतो, तो धोंडोपंतांचा असा 'हाइड' गवयाच्या रूपानें अवतरतो कीं काय ? संपादक म्हणून जाहिराती लिहिणारे कित्येक प्राणी जरा मोकळीक मिळाली कीं 'हॉं हॉं' करीत गडबडा लोळतात त्यांतलाच हा प्रकार असावा. तशांत धोंडोपंत हे जात्याच जरासे अकौंटंट-हिशेबी गृहस्थ ! त्यांनीं संगीतातलीं रागवार खातीं उघडून तालाच्या बेरजांनीं नफ्यातोट्याचा हिशेब मांडण्याची खटपट चालविलेली दिसते. उस्ताद म्हणजे 'आयटेम' पुकारणारा त्यांचा कारकून आणि त्यांची निळी पेन्सिल म्हणजे तो तंबोरा !

बरोबर; सगळ्या अनर्थांचें मूळ म्हणजे तो तंबोराच आहे. जास्त शोधाअन्तीं आम्हांला कळलें कीं, पन्तांना हा तंबोरा 'मिळाला' आहे. आम्हांला वाटलेंच ! पंधरावीस रुपयांचा आयता तंबोरा मिळाल्यामुळेंच या सज्जन गृहस्थाला एकदम आरडाओरडा करण्याचे डोहाळे झाले ! आणि अशा गोष्टी धोंडोपन्तांच्या बाबतींत पूर्वीं झालेल्या आहेत. एका भुक्कड फिल्म कंपनीचें ऑडिट पुरें होण्याच्या आंत ती कंपनी जेव्हां बुडाली, तेव्हां धोंडोपंतांनीं बिलापोटीं त्या कंपनीचा कपडेपट हस्तगत केला—आणि भाड्याची जागा घेऊन 'श्री भरतमुनी हौशी नाटक-समाज' काढला. (त्यांची आमच्या बन्यानें लिहिलेलीं नाटकें 'पडून' शेवटीं ते कपडे आम्हीं वाटून घेतले. तुर्की टोपी माझ्या वांट्याला आली होती.)

तसें त्या तंबोऱ्यामागें बरेंच कारस्थान होतें तें आम्हांला हळूहळू कळून आलें. धोंडोपंत चांगल्या जागेंत राहात होते. त्यांच्या जागेवर त्याच इमारतींत राहणाऱ्या काळोपंत काळेलेबुवा या गवयाचा डोळा होता; (त्याचा स्वतःचा आवाज कोता असल्यामुळें त्याला शेजाऱ्यांच्या तक्रारीची भीति नव्हतीच,) तेव्हां त्यानें केलें काय कीं मोठ्या अगत्यानें धोंडोपंतांच्या रसिकतेची तारीफ करून त्यांना तो तंबोरा नजर केला (त्याच्या खुंट्या व तारा धोंडोपंतांनीं स्वतः बसवून आणल्या) व एका खांसाहेबाची येजा (सुरुवातीला मोफत) धोंडोपंतांकडे सुरू करून दिली. हेतु असा कीं या अकौंटंटनें ओरडावें, शेजाऱ्यांनीं तक्रारी कराव्या आणि त्याची जागा 'खाली' झाल्यावर काळोपंत काळेले बुवांनीं हळूंच तेथें सरकावें !



# चौकशी कमिटी ९

सतरा नंबरांतल्या भाडेकऱ्यावर सगळ्यांची बारकाईची नजर होती. कारण तो एकटा होता, तरुण होता व बेपर्वा होता. पोरांनीं हैराण झालेल्या बायका (व त्या बायकांनीं हैराण केलेले त्यांचे नवरे) त्या तरुणाकडे जाहीर संशयखोरपणानें पाहात असत. त्याच्या येण्याजाण्यावर पाळत असे. तो कसा वागतो, काय करतो, कुठें जातो, याविषयीं तर्ककुतर्क चालत. मुलांना त्याच्या खोलीकडे फिरकायची सक्त मनाई होती. बारा वर्षांखालच्या 'निर्धोक' पोरी मात्र (आपल्या आयांच्या चेतवणीनें) त्या खोलींत आधुन-मधून डोकावून जात. तो खोलींत बसला तर बाहेरच्या गॅलरींत कुजबूज चाले, तो गॅलरींत उभा राहिला तर आसपासच्या खोल्यांतून हलक्या आवाजांत चर्चा चालत. तो सकाळीं लौकर कुठें तरी जाऊन अकराला परत यायचा. तो कुठें जात असावा याविषयीं खडाजंगी त्याच्यामागें शेजाऱ्यांत व्हायची. अकराला परत येण्यांत, हपिसांत जाणाऱ्या पुरुषांना चुकविण्याचा त्याचा डाव उघड आहे, असें एका ठमाकाकूंचें मत पडलें. तो पुरुषांशीं बोलणें टाळायचा म्हणून त्याला बायकांशीं बोलणें आवडत असावें, हा सरळ सिद्धान्त एका सखारामपंतानें मांडला होता. तो बायकांकडे पाहात नाहीं तेव्हां त्याची नजरच वाईट आहे, असें मोठमोठे डोळे करून कित्येक राधाकाकू तक्रारी आवाजांत कुरकुरायच्या. तो तुटकपणें वागतो याचें कारण, त्याचें त्याला एखाद्या पापामुळें खात असावें असा एका तारहपिसांतल्या शंकरानें शोध लावला होता. तो रात्रीं लौकर घरीं आला तर जणुं काय आपल्या आया-बहिणींना सांभाळण्याच्या पवित्र्यांतच आसपासचे असंख्य अंतूकाका उभे राहायचे. उशिरां आला तर त्याच्या बाहेरख्यालीपणाची ग्वाही द्यायला कित्येक इंग्रजी शिकलेले भिक्षुक टपलेच होते. तो 'धूर काढतो' तेव्हां तो चंगीभंगी व उधळ्या असावा, हा निःपक्षपाती कयास त्याच्या एका बाजूच्या

शेजाऱ्यानें काढला होता. उलट दुसऱ्या बाजूचा फुकट्या शेजारी त्याच्या सिगारेट्स ओढायला मिळत नसल्याचें पाहून त्याच्या कंजूषपणाची ग्वाही देत घरोघर हिंडला होता. फार काय हा सतरा नंबरांतला भाडेकरी धोतरें नेसला तर तीं छाकट्यासारखीं शुभ्र नेसतो आणि पैजामे पेहनला तर पोरकट दिसतो, इथपर्यंत त्याच्या तेथील जीवनाची छाननी झाली होती.

यावरून धूर्त वाचकांनीं ओळखलेंच असेल, कीं त्या तरुणाची सतरा नंबरची खोली कोठल्या तरी पांढरपेशांच्या वस्तींत होती. त्या वस्तींत एकजात छाप सुमारें एक ग्रोस मध्यम स्थितींतले पगार-मिळव्ये रहात होते. जंगली जातींत ज्याप्रमाणें व्यंग असलेल्या मुलास ताबडतोब मारून टाकतात, त्याप्रमाणें त्या मध्यमवर्ग नांवाच्या जातींतही त्यांच्या तपशिलाबरहुकूम न आढळणाऱ्या इसमास सामाजिक जीवनांतून मारून टाकण्याचे यथाशक्ति प्रयत्न होत होते. तथापि जगाच्या धकाधकींत त्या वर्गाला काडीचीही किंमत नसल्यामुळें ( व त्या लोकांइतकीच त्यांच्या पुढाऱ्यांची संख्या असल्यामुळें, ) खुल्या मैदानातील समाजजीवनांत त्यांच्या कारवायांनीं नकळत करमणुकीपेक्षां विशेष कांहीं वळल्याचें आढळत नव्हतें. निरपेक्ष चौकसपणा, व जगाची नीति सुधारण्याची स्वखुशीनें अंगावर घेतलेली जबाबदारी, हे पांढरपेशा मध्यमवर्गीय जन्तूंचे व त्यांच्या गोतावळ्याचे ठळक गुणधर्म तेथें वेळोवेळीं प्रकट होत होते.

आणि त्यांना अनुसरूनच सतरा नंबरांतल्या रहिवाशाविषयीं उभ्या बागवाडी [या 'पंचापरिधानी'] वसाहतीला अहर्निश काळजी लागली होती. पंचवीस वर्षें वयाचा तरुण एकटा—आणि कोणाच्या पंचायतींत न पडतां—आपल्या इमारतींत राहतो, रिकामपणीं चकाट्या पिटीत नाहीं, खाजगी रीतीनें जगायला पाहतो,—या एकंदर प्रकाराचा त्याच्या आस-पासच्या लोकांना विलक्षण विषाद वाटत होता. पांढरपेशाला खाजगी आयुष्य ? म्हणजे ?—दारें बंद करून बसतो, कोणाकडे जात नाहीं, कोणाला बोलावीत नाहीं, याचा अर्थ तरी काय ? उद्यां यानें बायको आणली तर

बुरख्यांतच ठेवायचा तो तिला ! मग ती ओलेती तर राहोच, पण नुसतीं उभें नेसलेली देखील कोणाला दिसायची नाहीं ! खासा न्याय आहे ! गॅलरींत हिंडणाऱ्या, लोळणाऱ्या नि वटवटणाऱ्या, लोकांच्या अस्ताव्यस्त बायका मात्र यानें पाहायच्या—मुद्दाम नाहीं पाहिल्या तरी त्या याला दिसणारच कीं नाहीं ?—आणि यानें मात्र एकटें राहायचें !

त्याच्या शेजाऱ्यांचा सात्त्विक संताप दिवसेंदिवस अनावर होऊं लागला. या बिनकुटुंबी ‘संट’ इसमाला खोली मिळाली कशी ? याचा छडा लावण्यासाठीं एक पांडूतात्या थेट वाडीच्या मालकापर्यंत जाऊन आले. पण तसाही तो सांपडण्यासारखा नव्हता; कारण सतरा नंबरची खोली घेऊन सुरुवातीलाच आठ दिवस ( आपल्या एका मित्रांची ) वृद्ध आईबापें तेथें नांदवून आपल्या गृहस्थी जीवनाचें पुण्याहवाचन त्या चाळींत त्यानें करून ठेवलेलें होतें. मालकांकडे चौकशी करणाऱ्या गृहस्थास एक मात्र आश्चर्यकारक गोष्ट कळली, कीं तरुण विवाहित होता ! या खळबळ उडविणाऱ्या बातमीनें त्या रात्रीं सतरा नंबरच्या खोलीजवळ बेसुमार वाद माजला—त्या खोलीचा भाडेकरी अर्थात्च बाहेर गेला होता. पंचवीस वर्षें उमरीच्या या माणसाला बायको असून तिला तो गुलदस्तांत ठेवतो, या गोष्टीची त्याच वयाच्या आसपासच्या दोनतीन कारकुनांना भयंकर चीड आली होती. कारण त्या लोकांना बायका होत्या—इतकेंच नव्हे तर प्रत्येकीं तीनचार पोरें होऊन त्या खायला उठलेल्या बायका त्यांचे चांगलेच गळे धरून बसल्या होत्या. या बदमाष सतरा नंबरवाल्याला मुलें नसावींत, या मत्सरी कयासानें एका मजलेकऱ्याला एक रात्र झोंप आली नाहीं—शिवाय त्याचीं स्वतःचीं कारटींही रातभर खोंकत होतीं. दुसऱ्या समवयस्क मजलेकऱ्याच्या मनांत एक चोरटी आशायुक्त अपेक्षा घोळत होती—कीं या सतरा नंबरी सोळभोगाचें आपल्या बायकोशीं पटत नसेल—पण नसलें पटत तरी इथें काय उपयोग ? त्या शक्य व्यंगाचा फायदा शेजाऱ्यापाजाऱ्यांना कसा होणार ?

अखेर एकमेकांच्या समाधानासाठीं या फटिंग भाडेकऱ्याची एक सबंध ‘केस’ त्याच्या अडोसीपडोसी सज्जनांनीं तयार केली—चाळींतील

एका उत्साही उपसंपादकानें त्या तर्कप्रणीत माहितीचीं त्रोटक टांचणें देखील बनवलीं! संशयित इसम हा बापानें हकालपट्टी केलेला, बायकोनें झिडकारलेला (व बहुतेक वाईट संगतीनें बिघडलेला) एक डॅब्रिस मनुष्य असावा; ज्यापक्षीं तो कोठेंही कारकून नाहीं त्यापक्षीं त्याचा कांहीं तरी लफंगेगिरीचा धंदा असावा. (अहो–खोलींत सगळीं बायकांचीं चित्रं लावलीं आहेत ना त्यानं!) ज्याअर्थीं त्याच्याकडे बिलवसुलीकरतां कोणी खेपा घालीत नाहीं व त्याच्यावर भाड्यासाठीं नोटीसा बजावल्या जात नाहींत, त्याअर्थीं त्याला पैशाची सोय चांगलीच असावी–जास्तच संशयास्पद! खोलीचीं दारें लावून बसतो, पुरुषाशीं बोलणें–व बायकांकडे पाहणें टाळतो त्याअर्थीं खास काळेबेरें असलें पाहिजे कांहीं तरी. तो क्रांतिकारक असावा ही पांचवी इयत्तेंतल्या एका तरतरीत गोपूची सूचना, वाजवीपेक्षां फाजील उदार दृष्टीची वाटून त्याच्या बापानें वेळींच एक टप्पल लगावून नापास केली होती. तो एखादा फरारी गुन्हेगार असावा या आशेनें, एका त्रिंबकरावांनीं आपल्या तोंडओळखीच्या एका फौजदाराला घरीं चहाला आणवून संशयिताला दाखवलेंसुद्धां होतें...

तो मधूनमधून रात्रीं घरीं येत नसे, हा तर त्याच्या बाहेरख्यालीपणाचा पुराच पुरावा समजून, चाळ–मालकाकडे आणखी एक अनौपचारिक शिष्टमंडळ धापा टाकीत धांवलें. 'असा धोकेबाज मनुष्य बिलकूल नको आमच्यांत' [प्रसंगीं वसईला जाऊन मुकाट्यानें षोक करून येणाऱ्या] एका सनातन्यांनें निक्षून सांगितलें; पण मालक आडमुठे, [अहो श्रीमंतच ते] ते म्हणाले, कीं 'तो माणूस बाहेरख्याली असला तर रात्रीं बाहेरच असलेला बरा, तुम्हांला तेवढीच काळजी कमी–काय? हा-हा-हा!' शिष्टमंडळ निरुपायानें परतलें.

* * *

आणि लौकरच तो क्षोभजनक प्रकार घडून आला.

शनिवारीं संध्याकाळीं एका तरुणीला तो आपल्या खोलींत घेऊन आला—

आणि सोमवारीं सकाळीं लौकर उठून दोघें बाहेर गेलीं!

दरम्यान ज्या काय दोनचार वेळां ती तरुणी खोलीच्या बाहेर दिसली त्या प्रत्येक खेपेला तिच्यावर चाळींतले कमींत कमी तीस स्त्रीपुरुषांचे साठ [व एकाक्ष धोंडूभाऊंचा एक मिळून एकसष्ट] डोळे तरी लागलेले होते. एका जास्त धीट चाळभवानीनें तर एकदां गॅलरींत अडवून तिला विचारलें देखील—

'काय हो, ते कोण तुमचे ?'

ती तरुणी नुसती हांसली.

आणि हा प्रकार एकदांच नव्हे तर चांगला दोन शनिवारीं झाला !

अखेर, चाळकऱ्यांच्या बिनसरकारी सभा होता होता—बायकांच्या तर त्या सकाळसंध्याकाळच चालत होत्या—'बागवाडी मंडळा'ची एक तांतडीची सभा भरली. या निर्लज्जपणावर उपाय काय करायचा ? मालकाकडे पुन्हां जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं—त्यांना काय कल्पना होणार आहे ? बरें, या मनुष्याला सरळ जाऊन जाब विचारणेंही सोपें नव्हतें, पक्का माथेफिरू दिसत होता तो—आला एकदम हातघाईवर तर करतां काय ? त्याला एक अब्रूची चाड नाहीं, पण आपल्याला चाळींत राहायचं आहे, दिलीन् एखादी थोतरीत—तर आपला नास नि जगाचं हांसं ! त्याच्याकडे बिनसरकारी शिष्टमंडळ घेऊन गेलें तर ?—पण एरवीं सार्वजनिक कामें उत्साहानें करणारे कित्येक चपळ चिटणीस या शिष्टमंडळाचे सदस्य होण्यास तयार होईनात. तो बदमाष काय करील याचा नेम नव्हता. तो निदान वयाला तरी मान देईल म्हणून तीन सर्वांत जख्खड म्हातारे त्याच्याकडे पाठवावे कीं काय, हा विचार होऊन तीन हेडक्लार्कांचीं नांवें सुचविण्यांत आलीं; पण तावडतोब तिघांनीं आपला अनुक्रमें चष्मा, कर्णा व पट्टा नादुरुस्त असल्यानें जाण्याचें नाकारलें.

अशा पेंचप्रसंगांत ती उभी वसाहत सांपडली होती.—दरम्यान सतरा नंबरांतला भाडेकरी तर आतां दर शनिवारीं आपला कार्यक्रम करूं लागला होता. चाळींत विलक्षण किलबिलीचें वातावरण होतें. दर शनिवारीं संध्याकाळीं दिवेलागणीला त्याच्यामागें ती पांढरं गोल नेसलेली खालीं मान घालून यायची व दर सोमवारीं सकाळीं सहाला त्याच्याबरोबर जायची (म्हणजे

लोक लौकर उठून अगदीं टपून राहायचेच्च ना पाहायला ? ) शनिवारच्या या जोडीच्या आगमन–प्रसंगीं ज्या दुर्दैवी चाळकऱ्यांना ती पाहायला मिळाली नसेल त्यांच्या बायका त्यांना सोमवारीं पहाटे जागें करून ठेवायच्या. या घोर पापाला शक्य तितकीं तोंडें फोडलीं पाहिजेत हें त्या पांढरपेशा चाळींतल्या नीतिमार्तंडांनीं अगदीं जवळजवळ ठरवूनच टाकलें होतें.

एके दिवशीं, ज्या चिवट माणसानें याचें लग्न झालें असल्याची बातमी काढली होती ( ज्यानें आपल्या निरलस चौकशा चालू ठेवल्या होत्या ) त्यानें एकाएकीं एक महत्त्वाची बातमी आणली कीं, आरोपीची सासुरवाडी खुद्द मुंबईला असून दादरला दमडीदास बिल्डिंगमधें त्याचा कुटुंबवत्सल सासरा रहातो. त्या सासऱ्याचें नांवदेखील या चौकस गृहस्थानें आपल्या डायरींत टिपून आणलें होतें.

सतरा नंबरवाल्या बिऱ्हाडाच्या सासऱ्याकडे जाऊन त्याच्या कानावर सर्व गोष्टी घालणें हा एकच मार्ग लोकांच्या नीतीसाठीं तळमळणाऱ्या त्या चाळींतल्या निरपेक्ष महात्म्यांना उरला होता. तो त्यांनीं ताबडतोब अमलांत आणला. सोमवारीं सकाळीं जसा तो त्या बाईबरोबर बाहेर पडला, तसे तडक चार बंडूनाना सदूभाऊ आपले धुतलेले कोट घालून दादरला निघाले. त्यांच्यांतल्या म्होरक्यानें त्या आणिबाणीच्या वेळीं चौघांचीं ट्रॅम तिकिटें आपण स्वतः काढलीं–( व पुढल्या आठवड्यांत सकाळच्या चहाचे वेळीं बाकीच्यांना गांठण्याची खूणगांठ बांधून ठेवली. )

माहितगारानें आणलेल्या पत्त्यावर चार मध्यमवर्गीय पांढरेपेशे अतिशय गंभीर चेहरे करून नवाच्या सुमारास जाऊन पोहोंचले.

स्वतःकडे हक्कानें वडिलकी घेणारा एक विचार करीत होता, कीं सरळ सारें सांगावयाचें व 'पोरवय आहे, होते चूक,' म्हणून थोडी दयेचीही शिफारस करायची म्हणजे तेवढाच आपला आब वाढेल.

दुसरा त्याचा शेजारीच होता तो मनांत म्हणत होता, कीं आतां तरी तो सतरा नंबऱ्या सासऱ्याच्या धाकानें बायकोला नांदवीलच कीं नाहीं दिसेलच मग म्हणावं बच्चाजी–

बाकीच्या दोघांना थोडीशी धास्ती वाटत होती–न जाणो हा सासराच तिरसट निघाला, तर नसत्या भानगडींत पडल्याचा गाढवपणा पदरीं यायचा.

इतक्यांत म्होरक्यानें एका दारावर पाटी वाचून ठोठावलें. अतिशयच गंभीर मुद्रा केलीन् त्यानें—

एका पोक्त व घाईत दिसणाऱ्या गृहस्थानें दार उघडलें.

' कोण पाहिजे ? '

' आपल्याकडेच आलों होतों—'

' आम्ही बागवाडी चाळींतले—'

' कुठल्या ? असं—असं आमचे जांवई राहतात ती चाळ, वा ! आहेतच ते इथें—बाबुराव—'

' नाहीं नाहीं—तसं त्यांच्याशीं—'

' आमचं काम आपल्याकडेच—'

' अंऽऽ तें—'

इतक्यांत आंतून सतरा नंबरच्या खोलीचा भाडेकरू बाहेर आला, आलेल्या लोकांकडे पाहून तो क्षणभर बुचकळ्यांत पडला, पण आठवल्या-सारखें हांसून म्हणाला,

' हं—हं—आमच्या चाळींतले नाहीं का तुम्हीं ? बसा, बसा ना—अण्णासाहेब, हे आमच्या चाळींतले बरं का ?' जांवयानें सासऱ्याला उद्दे-शून खुलासा केला.

' असं कां ? अरे वा, या बसा, तिथं बसा—कांहीं चहाबिहा. माल्, ए माल्—'

तितक्यांत आंतून एक तरुण मुलगी बाहेर आली. " ही माझी थोरली मुलगी माल्, यांना दिली आहे. अजून शिकते आहे तेव्हां तिकडे फारशी राहिली नाहीं—पुन्हां आमचे जांवईही आर्टस्कूलमधें आहेत—"

धांवती फिल्म पडद्यावर एकाएकीं उभी राहिल्यावर होणाऱ्या त्यांतील पात्रांच्या चेहऱ्यांसारखे बागवाडी चाळींतील शिष्टमंडळाचे चेहरे झाले !

ती मुलगी सतरा नंबरच्या खोलीवाल्यामागें खालीं मान घालून चालणारी, गोल पांढरं नेसणारी होती......

———

# पुरुषपार्टी



मुलींच्या—मुलींच्या कसचें, बायकांच्याच म्हणायला हरकत नाहीं—कॉलेजचें नाटक फारच रंगलें, असा दुसऱ्या दिवशीं सगळीकडे चांगला बोभाटा झाला. आतां त्यांत नायिका गाणारी नसल्यामुळें तिचीं सगळीं पदें 'व्हिलन'नें म्हटलीं, 'फौजदार' मधेंच एकदोनदां 'अय्या ऽऽऽ' म्हणून किंचाळला—वगैरे गोष्टी वेगळ्या. मुलींचें नाटक म्हटलें म्हणजे थोडेसें कौतुकानेंच पाहायला पाहिजे तिकडे. मीहि वहिणीला घेऊन त्या नाटकाला गेलों होतों, कारण तिच्या मैत्रिणीनें नाटकांत 'प्रांप्टर'चें काम केलें होतें. पण एवढ्या वशिल्यावर, मी कधीं त्या कॉलेजांत तिच्या मैत्रिणीची 'विचारपूस करायला' वहिणीला चोरून जाऊन तेथें बराच वेळ काढीत असेन, हा माझ्या मित्रांचा मिष्किल कयास मात्र चुकीचा होता. कारण गंगू जरी कॉलेजांत होती तरी 'तिच्या अंगीं गर्व म्हणून मुळींच नव्हता'—कसा असेल ? बिचारी गर्व तरी कशाचा करणार—आणि तिच्या बरोबरच्या बहुतेक मुली—मुली कसच्या बायकाच त्या, तशाच होत्या. गर्व करण्यासारखें बिचाऱ्यांना कांहीं—स्पष्टच बोलायचें म्हणजे—विशेषसें रूपही नव्हतें, आणि तारुण्य—

त्या संस्थेंत तारुण्याला मज्जाव होता, म्हणजे वयानें तरुण ठरण्यासारख्या कित्येक पोरी जरी तिथें होत्या तरी 'सरकारी' रीतीनें तेथें तारुण्याला 'ओळख' दिली जात नव्हती. तशी ती अगदीं नमुनेदार संस्था. पुरुषांचा वारादेखील लागू नये असा कडेकोट बंदोबस्त त्या कॉलेजला करून टाकलेला होता. तेथल्या शिक्षिका सुंदर किंवा तरुण नाहींत या खबरदारीनें निवडण्यांत आलेल्या होत्या. तेथले शिक्षक बिनधोकपणाचे मूर्तिमंत पुतळे होते. लग्नें होण्याची आशा नसलेल्या व आईबापांना किंवा पालकांना तूर्त लक्ष देण्यास वेळ नसल्यामुळें लग्नाआधींच्या

आढींत घालण्याच्या अशा महिला या 'महिलाशिक्षामंदिरांत' होत्या; माल या आढींतलीं फळें पिकण्याऐवजीं त्यांची आंबोशीच होऊन बाजारांत जायची. लग्नाच्या बाजारांत वयस्क विधूर व बेकार ध्येयवादी यांचेखेरीज या कारखान्यांतील मालाला गिऱ्हाईक नव्हतें. कॉलेज व होस्टेल भोंव-तालीं बारा फूट उंचीची मजबूत भिंत बांधलेली असून वर फुटक्या कांचा बसविण्यांत आल्या होत्या. बाहेर दिसण्यासारख्या खिडक्यांना दारजाळ्या बसविलेल्या असून प्रत्येक प्रवेशद्वाराला मजबूत गज लावलेले होते. या-शिवाय आंत मास्तरणींना जाड काळ्या कांचांचे चष्मे (व मास्तरांना गाडीच्या घोड्यासारख्या झांपडा) सक्तीनें लावायला लावीत असत, अशीही एक अफवा होती. अशा या नमुनेदार संस्थेंत निर्धोकपणें मुलींना अडकावून त्यांचे पालक निडरपणानें आपल्या व्यवसायाला मोकळे राहत—यौवनाची आम्रमंजरी जरा कुठें बहरूं लागत असतां या शिक्षण—खान्यांत शिरलेल्या पोरी अखेर सुक्या व कडवट आंबोशीसारख्या होऊन बाहेर पडत. त्यांच्या-तल्या कित्येक पिसाळत व पुरुषांना चावायला धांवत, त्यांची सांखळी धरून ठेवणारें एखादें मेषपात्रहि अशा गडबडींत निष्कारण सांपडें—असो.

सांगायचें असें कीं, मुलींचें तें नाटक फारच रंगलें. विशेषतः पुरु-षांचीं कामें करणाऱ्या मुलींचा अभिनय फारच चांगला झाला, असा गांवांत जिकडे तिकडे बोलबाला झाला.

दिवसभर तापलेल्या खडकाची ऊब संध्याकाळीं पकडीत गांवाबाहेर बसलेल्या दोघांतिघां पेन्शनरांत हाच विषय चालला होता.

जगापेक्षां वेगळें बोललेंच पाहिजे अशा ब्रीदाचे कृष्णराव म्हणाले,

'अगदीं तुम्ही म्हणतां तितकीं बेमालूम कामें झालीं. ठीक, मग ऐका—म्हणूनच यात कांहींतरी 'सीरियस' संशय येतो आहे मला !'

'अँ ?'

'म्हणजे ?'

'अहो मीदेखील होतों त्या दिवशीं त्या नाटकाला, पुरुषपार्ट कर-णाऱ्या पोरींकडे मी बारकाईनें पाहात होतों, मला तेव्हांच संशय आला—'

'काय—काय कसला संशय आला ?'

'अहो म्हणतांहात काय?' श्रोत्यांपैकीं रामभाऊ घाबरले; कारण त्यांची एक मुलगी त्या मुलींच्या कॉलेजांत होती.

'मला संशय म्हणजे काय–खात्रीच झाली न!'

'अहो, पण कसली?'

'तीं पुरुषांचीं कामं–तुम्हांला वाटतं तीं पोरींनींच केलीं—'

'वा! म्हणजे धडधडीत आपण सर्वांनीं पाहिलीं केलेलीं—'

'पण तीं कोणीं केलीं?' कृष्णरावांनीं विजयी मुद्रेनें विचारलें.

'पोरींनीं–आतां कोणच्या पोरींनीं तें मात्र आठवत नाहीं बुवा–'

'बाहेर भूमिका नि नांवें लिहिलीं होतीं एका फळ्यावर–'

'नांवं ढीग लिहिलीं होतीं–पण त्या मुलींनींच ते पुरुषपार्ट केले का?'

'मग कोणी केलीं?'

'तुमचं म्हणणं कोणीं पुरुषांनीं केलीं कीं काय?'

'एक्झॅक्ट्ली–म्हणणं काय, ॲफिडेव्हिट करायला तयार आहे ना मी मॅजिस्ट्रेटपुढें–इतकी खात्री आहे माझी–'

'छे छे' रामभाऊ (थोडेसें स्वतःच्या समाधानासाठींच) बोलले.

'त्यांनीं रंगवायला चांगला हुषार नाटक कंपनींतला मनुष्य आणला होता–'

'अर्थात्, त्याच्याबरोबर कोणी पुरुष घुसले असले पाहिजेत–'

'कोण पुरुष घुसणार?'

'अहो कोण–घुसलीं असतील कोणी कॉलेजांतलीं पोरें–महा वाह्यात् झालीं आहेत हीं कॉलेजचीं पोरें आजकाल—'

'पण महाराज, महिलाशिक्षामंदिरांत घुसणं कांहीं सोपं नाहीं; अहो, तुम्हांला आम्हांलादेखील इतक्या म्हातारपणीं जातां येत नाहीं तिथं एकदम—'

'स्त्रीपार्ट घेऊन घुसलीं असतील! आजकालचीं हीं तरुण कारटीं काय करतील याचा नेम नाहीं अगदीं—'

'छे छे, ती फौजदाराचं काम करणारी मुलगी मध्येंच चुकली तेव्हां 'अय्याऽऽ' करून किंकाळीसुद्धां—"

'अहो तें मुद्दाम! सोंग बेमालूम वठविण्यासाठीं—'

'फौजदाराचं सोंग?'

'नव्हे फौजदाराचं काम करणाऱ्या मुलीचं—'

'छे, कांहीं उलगडाच होत नाहीं बुवा!' एक रिटायर्ड फ. क्ला. सबजज्ज प्रामाणिकपणें म्हणाले, 'तुमचं म्हणणं असं कीं पुरुषपार्ट करणाऱ्या मुलींचीं कामं करण्यासाठीं कोणी पुरुष, स्त्रीपार्ट घेऊन नाटकांत सामील झाले?'

'संशयच नको–मी तेव्हांच ओळखलं ना? म्हटलं चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं—'

'अरे बापरे! म्हणजे त्या नाटकाच्या गडबडींत जर हे तीनचार पुरुष घुसले असले तर—'

'हरे राम! माझी बगीहि होती हो त्या नाटकांत–तिथं कपडे बदलायचे–रंगायचं–आणि तिथंच दोनतीन पुरुष! चला, याचा कांहीं तरी सोक्षमोक्ष लावलाच पाहिजे–चला!'

\+ \+ \+

महिलाशिक्षामन्दिराच्या नाटकांत पुरुषांचीं कामें तेथें स्त्रीपार्ट घेऊन घुसलेल्या कोणी पुरुषांनींच केलीं, ही बातमी सुरवातीला जरी गप्प म्हणून उठली, तरी पालकवर्गांत बरीच चुळबुळ सुरू झाली. पुरुषाच्या वाऱ्यापासून अगदीं दूरच्या जागेंत आपल्या पोरी अडकवाव्या आणि तेथें हा प्रकार घडावा–या नुसत्या संशयानें पछाडणारे पालक किती असतात–तें एखाद्या मुलींच्या हेडमास्तरणीलाच (छाती झाल्यास) विचारावें. सोंवळ्यां तदादरा बांधून ठेवलेल्या लोणच्याच्या बरणींत कोणी कोंबडीचीं अंडीं टाकलीं आहेत या दुष्ट धास्तीनें तळमळणाऱ्या ठमाकाकू–ठकूआत्यांप्रमाणें सचिंत पालक जमून आपापसांत कुजबूज करूं लागले.

लौकरच एका दिवशीं पोक्त व गंभीर पालकांचें एक खासगी शिष्टमंडळ महिला–शिक्षा–मंदिराच्या प्रिन्सिपॉलबाईच्या कचेरींत उपस्थित

झालें. त्यांतील पुढाऱ्यानें शक्य तितक्या धिटाईनें आपलें [ पाठ केलेलें ] भाषण म्हटलें,

'संस्थेवर कोणत्याहि तऱ्हेचा–हलगर्जीपणाचादेखील–आरोप करण्याचा आमचा हेतु नाहीं. पण आम्हांला आमच्या मुलींची काळजी आहे, आम्हाला एक चमत्कारिक बातमी मिळाली आहे–कीं परवांच्या नाटकाच्या वेळीं कोणी पुरुष मुलींत सामील झाले होते—'

'पण कोणाला कळल्याशिवाय तें कसं राहील ?'

'नाटकांतले पुरुषपार्ट त्यांनींच केलें असें—'

प्रिन्सिपॉलबाईंनीं रोखून बोलणाऱ्या पालकाकडे पाहिलें, पण त्याचा चेहरा इतरांइतकाच गंभीर व संचित होता.

'आपण या प्रकरणाची बारकाईनें चौकशी करून—'

'थांबा, मला वाटतं तुमची धास्ती मला लगेच दूर करतां येईल–'

प्रिन्सिपॉलबाईंनीं एका चिठ्ठीवर कांहीं लिहिलें व शिपाइणीला हांक मारून 'या सगळयांना बोलावून आण' असें सांगितलें.

शिष्टमंडळ एकमेकांच्या चेहऱ्याकडे पाहात बसलें होतें. इतक्यांत बाहेर कांहीं व्यक्तींची चाहूल ऐकूं आली.

'या आंत–' प्रिन्सिपॉलबाईंनीं फर्माविलें.

साड्या नेसलेल्या तीनचार व्यक्ति आंत आल्या.

'या पुरुषांचीं कामें करणाऱ्या मुली–' प्रि. बाइनीं शिष्टमंडळास सांगितलें.

शिष्टमंडळांतील सदस्यांनीं एकदांच त्या मुलींकडे पाहिलें–ताबडतोब उपरणीं सांवरीत गोऱ्यामोऱ्या चेहऱ्यांनीं बाईचा निरोप घेतला.

त्यांची पुरी खात्री झाली होती.

# विलायतचे पाहुणे

## ११

वाडींतल्या डाव्या बाजूच्या इमारतीची तळमजल्याच्या कोंप-ऱ्यांतली खोली म्हणजे एक मुशाफराखाना झाला होता. जागा काळोखी, ओलसर, कोंदट व जुनाट खरी; बरेच यात्रेकरू तेथें महिना दोन महिने मुक्काम करून मुंबईंत अन्यत्र सुखानें नांदत होते. बरेचसे नोटीसच्या महिन्याचें भाडें देऊनही तेथून त्वरेनें पाय काढीत होते. मुंबईला टॅप-रवारी येणाऱ्या लोकांनीं आठपंधरा दिवस राहून महिन्याचें भाडें देण्याचा पायंडा याच जागेवर पाडला होता. वाडींतल्या मंडळींना त्या जागेंतलें उतारू म्हणजे एक मोठा जिव्हाळ्याचा विषय झाला होता.

बरेच दिवस खालीं राहिल्यानंतर ती जागा उघडून एक दिवस वाडीचा मालकी गडी धोंडू तिथें साफसफाई करतांना दिसला. सुमारें अर्ध्या तासांत वाडींत सर्वत्र कळलें कीं शुक्रवारच्या बोटीनें तिथले भाडे-करू येणार आहेत.

रात्रीं भोजनोत्तर खुंटाखुंटावर उभे राहणारे गप्पांचे अड्डे याच विषयाची चर्चा करीत होते. "दुपारीं येणार आहेत म्हणे," सव्वापांच फूट उंचीचे व किरकोळ देहयष्टीचे चिन्तोपंत चष्म्याआडून गुणगुणले.

"कोंकणची बोट इतकी उशीरां यायला लागली कीं काय?" सदूनानांनीं पाठ खाजवीत सचिंतपणें प्रश्न केला.

"छे छे, ते बहुतेक म्हसकोव्हिया बोटीनें येत असतील," मधुकर सहज म्हणाला. तो आपले केंस विंचरीत बाहेर आला; असल्या फॅशनेबल बातम्या आपल्याजवळ इत्थंभूत असतात असें तो भासवीत असे. "ती बोट उद्यां एक एकोणीसला अलेक्झॅंड्रा डॉकला लागेल."

त्या गाळ्यांत मधुकर एकटाच पाटलोण वापरणारा असल्यामुळें त्याच्या बातमीबद्दल साशंक होण्याची कोणाची तयारी नव्हती.

दुसऱ्या दिवशीं संध्याकाळपर्यंत आगामी पाहुण्यांबद्दल बराच आगाऊ तपशील बाहेर पडला.

"अहो, त्या विष्णूपंतांच्या माहितीचे लोक आहेत ते. त्या केशवराव देशपांड्यांच्या मावसभावाचीं माणसें—"

"बस्स का? आम्हीं समजत होतों कोणी बडीं धेंडें यायचीं आहेत—"

"बरींच माणसें आहेत म्हणतात—"

"म्हणजे फॅमिलीची विलायतेला गेली होती कीं काय?"

"दोघे मोठे पुरुष आहेत, त्यांच्या बायका, एकीचीं तीन मुलें आणि एका गृहस्थाची आई—"

"संस्थानिक आहेत कीं काय कोणी?"

"नाहीं नोकरदारच आहेत—"

"बरेच मोठे अंमलदार दिसतात—"

"तिन्हीं मुलें बरोबर न्यायचीं म्हणजे कांहीं चेष्टा नाहीं आज—"

"आणि आई पण—"

"अहो ती त्या दुसऱ्याची—"

"अहो, दुसऱ्याची कां होईना? आजकाल आपल्या म्हातारीला तरी विलायतेला घेऊन जाणारा कोण हरीचा लाल आहे—?"

"याला म्हणावं मातृभक्ति—"

"आणि मुलांवर तरी एवढी माया कोण करतंय आजकाल? खुशाल तोडून बोर्डिंगांतून ठेवतात आणि आपण जातात हवा खायला—"

"हीं माणसं बाळबोध वळणाचीं दिसतात बरं कां ?"

"पण आज तीं गावंढळ हो! हे तुमचे नवमतवादी त्यांना हांसायचे—"

"पण अंतूकाका, तुम्हांला विलायतेला जायची शक्ति आली म्हणजे न्याल का तुमच्या गंगाकाकूंना, नमीचिमीला, गणूगंपूला नि वैनीला?"

"अहो, कोण लेकाचा विलायतेला जातो आहे?"

शुक्रवारीं सकाळपर्यंत सार्वजनिक उत्कंठा बऱ्याच प्रमाणांत वाढली होती. इतका रसभरीत विषय सोडून आपापल्या कामावर जाणें भाग असल्या-मुळें पुरुषमंडळींनीं आपलें कुतूहल नाइलाजानें बायकांकडे सोपविलें होतें; त्यामुळें तर स्थानिक स्त्रीवर्गांत फारच उत्साह उत्पन्न झाला होता.

"मेलीं मांसमच्छर खाणारीं नसलीं म्हणजे पुरवलीं," वयोवृद्ध सगुणाबाई म्हणाल्या.

"जुन्या वळणांचीं माणसं आहेत म्हणतात—"

"पण विलायत ती—"

"कां हो त्या बायका गोल नेसत असतील नाहीं ?"

"घरांत बूट घालून हिंडायची पद्धत आहे म्हणे तिकडे—"

"बोलाचालायला कशा आहेत कोण जाणे, नाहीं तर निघायच्या कुरेंबाज—"

"म्हटलं जरा ओळख झाली तर एखादा तिकडच्या फ्याशनचा ब्लाऊझ तरी बेतून घ्यावा."

"तिकडून आलेल्या बायका म्हणे चोवीस तास पुरुषांतच बसतात."

"खात असतील कां हो तसलं कांहीं ?"

"कोणी सांगावं ? सिगारेट देखील ओढीत असतील— ?"

"केंस कापून तर घेतले नसतील मानेपर्यंत ?"

"मुलांना जाऊं देतां कामा नये तिकडे—"

"काय काय भ्रष्टाकार होईल तेवढा थोडा आहे—"

"पण एकाची आई म्हातारी, असेल वचक थोडा—"

"किती हो आईवर भक्ति, विलायतेला बरोबर नेलं होतं ना ?"

"जुन्या माणसांत असतं हो असं, तुमच्यासारखी अडचण नाहीं होत त्यांना आईबापांची."

"अहो, आईबाप तसे पाहिजेत——"

"ही म्हातारी कशी आहे कुणास ठाऊक——"

"नाहीं तर तीही फॅशनेबल निघायची——"

दुपारीं अडीचच्या सुमारास वाडीसमोर दोन व्हिक्टोरिआ उभ्या राहिल्या. बिनरंगी पत्र्याच्या ट्रंका, एकदोन लांकडी पेट्या, गोणपाटांत शिवलेले कित्येक डाग, कांहीं गाठोडीं, सतरंज्या व घोंगड्यांतून काथ्याच्या दोरीनें बांधलेल्या थोड्या वळकट्या, एक चटयांचें बंडल, कडीचे तांब्ये, डबे, शिंकाळी केलेली एक चरवी, वगैरे हरतऱ्हेच्या मालानें त्या गाड्या वांकल्या होत्या. जागा सांपडेल तशी ठिकठिकाणीं बसलेलीं लहानमोठीं माणसें गाडीवरून कोठून कोठून उतरलीं.

प्रथम घट्ट सूट घातलेला व डोक्याच्या मानानें थोडी लहान हॅट अलगद ठेवून चालणारा एक गृहस्थ थंडपणें अस्ताव्यस्त पाय टाकीत कोंपऱ्यांतल्या जागेकडे गेला. त्यानें काळसर चष्मा लावलेला होता व त्याची दोन दिवसांची दाढी वाढलेली होती. त्याचें बोट धरून, जरीची टोपी, फलाणीची लाल बंडी, गुंड्या सुटलेली चड्डी, रंगीत लोकरीचे मोजे व त्यावर चाळ घातलेला एक लहान मुलगा होता.

"कोणी नोकरमाणूस दिसतो." हलकेच कुजबूज सुरू झाली.

"असेल कारकून बिरकून—"

इतक्यांत कडेवर एक शेंबडें मूल व दुसऱ्या हातांत भलें मोठें गांठोडें धारण करून एक ऐसपैस बांध्याची बाई मैदानांत आली. तिचे केंस अस्ताव्यस्त होते, कुंकू मोठें ढोबळ लावलेलें होतें. हिरव्या रंगाचा लांब बाह्यांचा एक पोलका तिनें परिधान केला होता. तिचे ओंचे सुटलेले होते व पायांत धुळीनें माखलेल्या चपला होत्या.

"चिंगे, चल लौकर," ती मागें वळून रेंगाळत येणाऱ्या एका कळकट पोरीला म्हणाली. घाईंत खालीं पडलेले सागरगोटे वेंचीत ती मुलगी पुढें येऊं लागली.

"नोकराचा इतका परिवार—जहागिरदार तर नाहींत कोणी ?"

पहिल्या बाईपेक्षां किंचित् अधिक स्थूल व अधिक गबढ्याळ बाई कांहीं नग काखेंत व कांहीं हातांत उचलून आणूं लागली. मुख्य पात्रें हींच असें दिसूं लागलें.

"अगदीं साधी मंडळीं आहेत हो—"

" विलायतेचं पाणीदेखील लागलं नाहीं. "

" वडील माणूस होतं ना बरोबर–"

" आणि पोराबाळांचं लेंढार–"

" अहो अजून मुख्य माणसं यायचींच असतील–"

" ती पहा म्हातारी आली–"

एका हातांत फराळाचा चारमजली डबा व दुसऱ्या हातांत एक धाबळींत बांधलेलें गाठोडें घेऊन एक जुन्या पद्धतीची विधवा म्हातारी सावकाश त्या नव्या जागेकडे गेली.

"आतां एकच मनुष्य राहिला आहे," वाडीच्या फाटकाकडून बातमी आली.

"तोच बहुतेक मुख्य मालक असावा."

एका पाटीवाल्याशीं इतका वेळ हुजत घालून त्याच्याबरोबरचा वाद चालतांचालतांही चालू ठेवणारा शेवटचा पाहुणा वाडीच्या रंगभूमीवर आला. विलायती फॅशनचे कपडे घालूनही, 'तरतरीतपणें चालणें म्हणजे अराष्ट्रीयता आहे' असें मानणारा तो सद्गृहस्थ पहिल्या गृहस्थाच्याच छापाचा होता.

"संपलीं, एवढींच माणसं–" कोणी पुटपुटलें.

शेवटचा पाहुणा डाग मोजीत होता. पाटीवाल्याला पैसे देऊन तेथेंच एका ट्रँकेवर तो बसला व खिशांतली विडी काढून त्यानें पेटविली.

"कमाल आहे हो साधेपणाची—"

नंतर एकच्या प्रशस्त बाईनें व्हरांड्यांत दोन वर्तमानपत्रें आंथरून दोन मुलांना तेथें आणून बसवलें. नंतर एकाच्या गृहस्थानें चूळ भरून टाकली व विजारीच्या आंतल्या शर्टच्या घोळाला तोंड पुसलें. म्हातारी धाबळी नेसून आपलें लुगडें धुवायला वाडींतल्या गड्यांच्या नळावर आली.

" विलायतचे कांहीं पण ढंग नाहींत हो या माणसांना–"

आपल्याला पाश्चात्य संस्कृतीचा यत्किंचित्‌ही उपसर्ग झाला नाहीं हें दाखविण्याचा त्या कुटुंबानें जणु काय निश्चयच केला होता. त्यांच्यापैकींचे

दोन गब्राळ पुरुष उघडेबंब होऊन व्हरांड्यांत हवा खायला उभे राहात असत, म्हातारी बहुतेक वेळ सोंवळ्यांतच असे, पोरें कपड्यांची पर्वा न बाळगतां बाहेरच खेळत होतीं, वळकटीच्या दोन्या खांबांना बांधून त्यांच्यावर रोज घरांतील यच्चावत धुणें खुल्या दिलानें वाळत टाकतांना नव्या बिऱ्हाडांतल्या सुगृहिणी आढळत होत्या. लौकरच त्यांच्याशीं बोलण्याइतकी आपुलकी आसपासच्या बिऱ्हाडकरूंना वाटूं लागली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं काळी राखुंडी घेऊन दांत घाशीत उभ्या असलेल्या दोन नंबरी इसमाला चिंतोपंतांनीं अदबीनें विचारलें,

" तिकडच्या मानानं बराच फरक वाटत असेल तुम्हांला ? "

" फार! इथं कितीतरी थंड हवा, तिकडे म्हणजे अगदीं रखरखीत, पुन्हां पाण्याची टंचाई–"

" असं ? माझी समजूत होती कीं तिकडे थंडी नि पाऊस भरपूर म्हणून–"

" अहो, आपल्या लोकांना कल्पना नसते. "

संध्याकाळीं दुसऱ्या एका खुंटावर चिन्तोपंत हलकेच म्हणाले,

" तो एक गृहस्थ मोठा विक्षिप्त दिसतो–"

" कां ? "

" मला सांगत होता कीं तिकडे भयंकर उन्हाळा नि पाण्याची टंचाई असते म्हणून–"

" वाहवा, अहो तिकडे तर बारा महिने मुसळधार पाऊस–"

" आणि त्यांतून बर्फ पडण्यासारखी थंडी–"

" अहो, तो थापाड्या असेल नाहींतर बनवीत असेल तुम्हांला–"

" बायकांतूनही अशीच बातमी आहे; तिकडे म्हणे पाण्याचा देखील रतीब लावावा लावावा लागतो पैसे देऊन–"

" आणि म्हातारी म्हणत होती कीं लोक सगळे काळेकुट्ट–"

" म्हणजे हे विलायतेहून आले कां आफ्रिकेहून ? "

" कां हे लोक ते नव्हेत ? "

" मलाही आतां संशय वाटायला लागला आहे—"

" पण धोंडू सांगतो कीं हेच ते बोटीनें आलेले पाहुणे."

" कोंकणांतून खास आले नाहींत हे—"

" काढली पाहिजे बातमी एकदां—"

ती मंडळी बहुतेक सगळीं बरोबर बाहेर जायचीं व दर वेळीं दोघा गृहस्थांचे अंगाला सुखावह न होणारे साहेबी पोषाख, ऐसपैस बायकांचे दागदागिने, म्हातारी व तीन मुलें ही मिरवणूक एका गाडींत अथवा टॅक्सींत भरून निघायची. प्रत्येक खेपेला त्यांची मातृभक्ति व अपत्यनिष्ठा यांचें कौतुक व्हावयाचें. एकदोन महत्त्वाकांक्षी पिते आपल्या मुलांना या कुटुंबाचें उदात्त उदाहरण दाखवून म्हणायचे, 'पहारे बाबांनो, तुम्ही विलायतेला कधीं गेलांत तर इतकें निर्लेप राहून आलें पाहिजे. साहेब बनून येण्यांत कांहीं मोठें शहाणपण नाहीं.'

दुसऱ्या तिसऱ्या दिवशीं शेजाऱ्यांचा पुढाकार घेऊन मधुकर त्या लोकांशीं मुद्दाम बोलायला गेला.

" तुम्ही कसे आलांत, मार्सेल्सवरून कां ब्रिंडिसी?"

" आम्हीं थेट आलों—"

" तीन आठवड्यांचा प्रवास म्हणजे कंटाळा येत असेल नाहीं?"

" छे हो, चारपांच दिवसांची ट्रिप—"

" म्हणजे? कोठून आलांत तुम्हीं मंडळी?"

" एडनहून; बॉम्बे गव्हरमेंटच्या हद्दींत होतें ना तें इतक्या दिवस? आतां क्राउन कॉलनी झाली. आम्ही इथल्या सर्व्हिसचे, मी नि तो माझा स्नेही कुशाभाऊ; आतां इथें आमच्या जुन्या ग्रेडमधें परत आलों, तिकडचा अलावन्स बुडला—"

यानंतर बराच वेळ तो गृहस्थ 'केडर,' सबस्टॅंटिव्ह पे,' ऑफिशिएटिंग पोस्ट,' 'रिलीव्हिंग टाइम' वगैरे भाषेंत बोलत होता...

———

# रविवारचें अग्निदिव्य



सर्वांना आदल्या रात्रीपासूनच ती दहशत बसली होती. प्रभ्या, नान्या, सुधी, या 'समजूतदार' गणांनीं, 'उद्यां सकाळीं काय होणार' या माहितीमुळें धास्ती घेतली होतीच, पण धाकट्या बेबीनेंसुद्धां भावंडांच्याकडे पाहून गांभीर्याचा आव आणला होता. सर्वजण शनिवारीं रात्रीं लौकरच 'झोपीं गेलीं' खरीं, पण त्यांची चुळबुळ बराच वेळ चालली होती.

'श ऽऽऽ' पलीकडे निजलेल्या नान्याला प्रभ्यानें हळूच हांक दिली. त्या खोलीच्या चारी भिंतीजवळच्या चारी कॉटस्‌वरून ढोंगीपणें मिटून ठेवलेले डोळे जोड शिंपांसारखे उघडले.

'शऽऽऽ' छोट्या बेबीनें तोंडाचा चंबू करून त्याच्यापुढें उभें बोट धरून सहज उद्‌गार काढले.

हा प्रयोग दादाइतकाच बरोबर येतो हें पाहून तिनें डोळे मोठे करून त्या खोलींतल्या तिघांना बजाविलें 'शऽऽऽऽ–'

'ए, शऽऽऽऽऽऽ–शऽऽऽऽऽऽऽऽऽऽ–'

'बेबे, चूप !' प्रभ्या खेकसला. बेबी चूप झाली. प्रभ्या, नान्या व सुधी, कोंपर व तळवे यांचा हनुवटीला स्टॅण्ड करून, आपल्या अंथरुणावर सरड्यासारखीं झालीं.

मुलांच्या खोलींत एक सुरेख चिमुकला, अगदीं मंद दिवा लावलेला होता. सुधीच्या कॉटवर आज एक चांदण्याची तिरीप आली होती. प्रभ्यानें भिंतीवर हत्ती, उंट, मांजर, कुत्रा, अशा मंडळींना माणसांसारखे कपडे घालून चितारलें होतें. रात्रींच्या अंधुक प्रकाशांत मुलांना वाटायचें कीं हीं जनावरें कसलीं, हीं आपल्याशीं खेळणारीं माणसेंच–जशीं कांहीं आपलं

बोलणं अगदीं मन लावून ऐकताहेत. 'झोंपा' म्हणून आई सांगून गेल्या-नंतर हळूहळू कुजबुजायला किती छान खोली होती ती !

ती चाळीस चोरांची 'गुंफा' म्हणून मुलांनीं ठरवून, आपल्या या निजायच्या, कपडे ठेवावयाच्या, अभ्यास करायच्या (!) नी दंगा करा-यच्या खोलीला त्यांनीं




अशी पाटीदेखील बाहेर लावली होती:—'चाळीस चोरांची' म्हणून लिहिलं तर आईबाबा थट्टा करतील, म्हणून तीं अक्षरें लिहून, पुनः बोटानें काढलेल्या शाईच्या पट्ट्यांनीं अगदीं दिसेनाशीं केलीं होतीं—( तरी मला वाटतं बाबांनी पाहिलीं तीं अक्षरं—नी ते एक दिवस गंभीरपणें म्हणाले, कायेर नान्या, गुंफा चोरांची दिसत नाहीं बंर का, लांडग्यांची दिसते—)

आज गुंफेतल्या चोरांचें सम्मेलन नसून युद्धमंडळ भरलें होतें. आणिबाणीचा प्रश्न हा होता कीं उद्यांच्या आपत्तीला तोंड कसें द्यावें ? उद्यां—

—'तितितिति दुनी, बाल माऽजा हा ।' सर्वांत धाकटें चोरुकलें एकदम गाऊं लागलें.

'ए कारटे,' नान्या चिडून ओरडला.

'गप रे नान्या, मी करतें तिला गप्प' सुधीनें उठून, निजून राहण्याची व गप्प राहण्याची आवश्यकता बेबीला सांगितली. बेबीला ताई आवडत असे. ताई काय सांगते समजून घेण्याच्या भरीस न पडतां ताईच्या एका कुरवाळीनें बाळ झोपीं गेलें.

उद्यां सकाळीं—हरहर—नको तो शब्द—आठवणीनें देखील कसेंसेंच होतें—एरंडेल घ्यायचें होतें.

आईनें एकदां एरंडेल देण्याचा निर्धार केला कीं बाबांची देखील मात्रा चालत नसे—मग बाबालोकांची कुठली शान लागून राहिली आहे ?

प्रोग्रेसबुक घेऊन बाबांच्यापुढें उभें राहण्याचा दिवस आणि एरंडेल पाजण्यासाठीं आई पुढें उभी राहते तो दिवस—चोरांच्या गुहेला त्या सुट्ट्या असत—चोरांच्या नाड्या ढिल्या पडत त्या दिवशीं ! सुट्ट्या !! काय भेसूर विडंबन त्या नांवाचें !

प्रभ्या घोगऱ्या आवाजांत म्हणाला, 'मला वाटतं उद्यां सकाळीं दहा वाजेपर्यंत उठूंच नये—'

'छट्! धांदरटच आहेस अगदीं दादा तूं. एकदां असं केलं तेव्हां आईनं ओढून कॉटखालीं काढलं, मी पुन्हां कडी लावून आंत राहिलों तेव्हां दिवसभर उपाशीं ठेवलंन्—'

नान्या धाकटा भाऊ असून प्रभ्याला दम देत असे—नी सुधीला पण.

'प्यायल्यासारखं करून टाकून द्यावं—' सुधीनें कल्पना काढली. नान्या तिच्यावरही घसरला,

'चल हट्, गाढव कुठली—आई आंधळी आहे कीं काय ?"

'मग काय करावं बुवा ?" प्रभ्या विचारांत पडला.

'मला तर झोंपच येत नाहीं—' सुधी म्हणाली.

गुहेच्या तोंडाबाहेर एक प्रेमळ आवाज आला,

'निजा़रे पोरानो, उद्यां सकाळीं लौकर उठायचं आहे—'

तीन पांघरुणें एकदम तीन डोक्यांवर गेलीं.

कांहीं वेळानें नान्यानें बुरखा काढला,

'आपण शूर आहोंत असं आईला दाखवायचं चेहऱ्यावरची रेघ-देखील हालूं द्यायची नाहीं—नी असं केलं तर आई संध्याकाळीं कांहींतरी छान देईल एकादे वेळीं—' नान्या निर्धारी आवाजांत—पण थोड्या आशेनें म्हणाला.

नाइलाज केव्हां आहे हें व्यवहारचतुर नान्याला सर्वांच्या आधीं कळत असे. बेबीला कांहींच भीति नव्हती—ती एरंडेलबशींतून चविष्टपणानें पीत असे.

हळूं हळूं सगळ्या चोंची गप्प झाल्या. रात्रीं मिटणाऱ्या फुलां-सारखीं निष्पाप मुखें झोंपलीं—

आणि भिंतीवरचीं, माणसांचे कपडे घालणारीं माणसें—तो लठ्ठ हत्ती, तो अडाणी उंट,, तें मांजर, तो कुत्रा, सगळे आपापल्या जागेवरून उठून चार कोंटांच्या मधल्या त्या चौकांत, चांदण्याच्या कवडाशांत, खेळायला लागले....

———

# सरकारी दारूबाज

# १३

[ चाणाकी मुक्कामीं दारूबंदीच्या पहिल्या दिवसानिमित्त झालेल्या समारंभाचे वेळीं दे. भ. विरूपाक्ष चेट्टियार यांचें डोकें फोडून विराप्पा नामक इसमानें त्यांचा प्राण घेतला. आरोपीनें खालीलप्रमाणें स्टेटमेंट केलें. ]

जीव बचावण्यासाठीं मला कांहीं एक सांगायचें नाहीं. कायद्याच्या दृष्टीनें मी गुन्हेगार आहे, व योग्य ती शिक्षा भोगण्यास मी तयार आहे. मी एका माणसाचा जीव घेतला, याबद्दल मला कसलीही सबब सांगायची नाहीं—पुन्हां प्रसंग आला तर मी हेंच करीन. खून हा मी गुन्हा केला व या गुन्ह्याला पुरेशी चिथावणीही नव्हती, असें सरकार म्हणेल—मला गुन्हा कबूल आहे.

पण मला पुरेशी चिथावणी होती, ती पुराव्यांत दाखल होणार नाहीं, कारण बचावासाठीं पुरावा देण्याची मला इच्छा नाहीं. गळफासानें मरण्याची मला यत्किंचितही भीति नाहीं–कारण जिवन्त राहण्यांत मला कांहीं गोडी नाहीं–मी मरायला तयार आहें, मरणाची वाट पहात आहे.

विरुपाक्ष चेट्टियारला मी ठार मारलें. त्याचा जीव घ्यायला तितक्यांतच झालेलें असें कांहीं कारण सरकारला दिसलें नाहीं–कारण या खटल्यांत स्वतःचा बचाव करण्याची मला जरूरी वाटत नाहीं. कसें तरी मरायचें तर निदान जगांतल्या एका ढोंगी बदमाषाच्या रक्तांत हात धुवून तरी फांसावर मरावें—यांतच मला पूर्ण समाधान आहे.

माझें पुरें नांव वीरमणियन् नायर. माझें गांव कोलंगोड. लढाईच्यावेळीं वाहतुकीच्या एका पलटणींत मेकॅनिक–कार्पोरल म्हणून मी इराकमध्यें जाऊन परत आलों. आल्यावर चाणाकीला मोटर दुरुस्तीचें गॅराज उघडलें. सुरवातीपासूनच माझा धंदा चांगला चालत होता.

माझ्या घरासमोर सोनूस्वामी आयंगरचें घर होतें. तो चाणाकी ए. व्ही. स्कूलमध्यें मास्तर होता. त्याची मुलगी कामाक्षी मॅट्रिकला बसत होती. मला ती आवडत होती; ती जेव्हां जेव्हां दिसेल तेव्हां तेव्हां मी तिला पाहण्याचा प्रयत्न करीत होतों. ती मात्र माझ्याकडे कधीं पहात नसे, कारण तसा तिच्या बापाचा कटाक्ष होता. तीं माणसें स्वच्छ कपडे वापरीत. मी मेकॅनिक असल्यामुळें माझे कपडे तेलकट व मळके असत. धुवट लोकांना मळखोर कामगारांशीं बोलण्याचा कमीपणा वाटतो हें मला माहीत होतें—मलाहि त्यांच्या भेकड पांढरपेशाबद्दल तिरस्कार होता. मी आपण होऊन तिच्याशीं कधीं बोलायला गेलों नाहीं. तशी वेळ अगदीं अचानक आली—तिच्या बापाला वाटलें कीं मींच ती वेळ आणली. पण मी ती आणली नाहीं.

एक दिवस दिवेलागणीला मी गॅराजकडे बाजाराच्या बाजूनें परत येत होतों त्याच बाजूला विरुपाक्ष चेट्टीयारचा बंगला व बाग होती. मी त्याच्या फाटकावरून येत असतां 'नको नको, सोडा मला!' असा आवाज ऐकूं आला. मी डोकावून पाहिलें तों चेट्टीचा हात झिटकारीत कामाक्षी दूरदूर होत होती. तो दोन्हीं हातांनीं तिला ओरबडत 'नुसतें तुझ्या वेणींत एवढें फूल घालतों,' असें म्हणत होता. मी चटकन् पुढें होऊन त्याला दूर ढकलला व 'सोड तिला' इतकेंच म्हणालों. कामाक्षी चटकन् माझ्या आड झाली. क्षणभर विरुपाक्ष चेट्टीनें विषारी डोळ्यांनीं माझ्याकडे पाहिलें व 'याचा पस्तावा होईल तुला' असें तणतणत तो निघून गेला. कामाक्षीला मी घरीं पोहोंचविलें.

मी मुद्दाम रेंगाळत चाललों होतों, मी तिला म्हणालों,

'माझ्यासारख्या हलक्या कामगाराबरोबर तुला आलेली पाहून तुझे वडील रागावतील.'

ती बोलली नाहीं, तिनें नुसतें माझ्याकडे चमकून पाहिलें. मी समोर पाहात होतों. मी जरा वेळानें म्हणालों,

'अंगमेहनतीनें पोट भरणाऱ्या लोकांशीं पांढरपेशांनीं बोलायचें नसतें—'

तेव्हां ती हळूच बोलली,

'बाबांना आवडत नाहीं—'

'आणि तुला?'

तिनें नुसतें दुसरीकडे पाहिलें. मीही मुद्दाम दुसरीकडे पाहात बोलूं लागलों,

'आजचा दिवस मी जन्मभर विसरणार नाहीं—'

ती कांहीं बोलली नाहीं. मीच पुन्हां बोललों,

'रोज पाठ दुखण्याइतकें काम करून वर्कशॉपबाहेर वाऱ्याच्या झुळूकीसाठीं आलों, कीं माझे डोळे तुझ्या घराकडे लागतात. तूं दिसलीस म्हणजे दिवस मिळवला असें मला वाटतें.'

इतक्यांत आम्हीं तिच्या घरासमोर आलों. तिनें पहिल्यानेंच माझ्या नजरेला नजर देऊन पाहिलें,

'मला तुमच्याशीं बोलतां येत नाहीं—पण—आज तुमच्यामुळें मी सुटलें—'

ती घरांत शिरली. तिचा बाप पुढेंच होता. तिनें हळूच त्याला झालेला प्रकार सांगितल्यावर त्यानें चेहऱ्याला घडी पडूं न देतां तुटकपणें माझे आभार मानले.

पण दुसऱ्या दिवसापासून मी तिच्या घराकडे पाहिलें तर पुष्कळदां तीही माझ्याकडे पाहूं लागली होती. पण हें फार दिवस टिकलें नाहीं. विरुपाक्ष चेट्टीनें माझ्या वर्कशॉपची जागा विकत घेतली. मला हमरस्त्याला जागा मिळूं नये म्हणून त्यानें शिकस्त केली. स्टेशनाच्या बाजूला पत्र्याच्या शेडमध्यें माझें वर्कशॉप सुरू झालें. कामाक्षी मला दिसेनाशी झाली. माझ्या धंद्यालाही मंदी आली.

कांहीं दिवसांनीं मला कळलें कीं सोनुस्वामी आयंगार ताप येऊन मेला—पांढरपेशा आणखी कशानें मरणार?—मीं लगेच त्याच्या घरीं जाऊन शोध केला, पण घराला कुलूप होतें. शोध केला तेव्हां समजलें कीं कामाक्षी नंतर कोठें गांवाला गेली होती.

नंतर पुष्कळ दिवस गेले. कॉंग्रेसच्या सत्याग्रहाची वावटळ आली. मी त्यावेळेपर्यंत दोस्तांबरोबर कधीं कधीं दारू प्यायाला लागलों होतों.

' दारू पीना हराम है ' अशी सारखी ओरड ऐकून मी दारू मनापासून सोडून दिली होती. चाणाकीला मोठमोठ्या सभा भरत होत्या. विरुपाक्ष चेट्टी देशभक्त झाला होता. कलेक्टरच्या शिफारशीनें मिळविलेली रावसाहेबी त्यानें सोडली होती. कलेक्टरसाठीं देण्याच्या देणगीच्या रकमा तो आतां कॉंग्रेसला द्यायला लागला होता. तो चाणाकी कॉंग्रेस कमिटीचा प्रमुख झाला होता. ताडी-माडी-बेवड्यावर पिकेटिंगचा त्यानेंच जोर धरला होता—आणि वैझागपट्टणाला जाऊन तो व्हिस्की पिऊन येत होता असें त्याच्याच ड्रायव्हरनें मला सांगितलें होतें.

एक दिवस मी माझी लॉरी घेऊन स्टेशनवर गेलों होतों—कारण कांहीं जरूरीचे स्पेअर पार्टस् त्या दिवशीं रेल्वेनें यायचे होते. प्लॅटफॉर्मवर बरेचसे देशभक्त, स्वयंसेवक आणि तमासगीर जमले होते. गाडी आली, मोठमोठे जयजयकार झाले, गाडींतून कांहीं केशरी व कांहीं पांढऱ्या साड्यांच्या पोरी उतरल्या. मी पार्सल व्हॅनकडे जाऊन माझें आलेलें सामान घेतलें, व स्टेशनच्या बाहेर पडूं लागलों. त्याच वेळीं खादीवाल्यांचेंही लटांबर बाहेर पडत होतें. तिकिटाच्या फाटकांतून केशरी साडी नेसलेल्या पोरी जात होत्या म्हणून पुरुष जरा बाजूला पण जवळच उभे होते. त्या पोरींत शेवटीं कामाक्षी होती.

' कामाक्षी ! ' म्हणून हांक मारून मी तिच्या पाठोपाठ बाहेर पडलों.

ती थबकली. तिनें मला ओळखलें.

' तुम्ही होय ? ' ती म्हणाली.

' इतके दिवस कुठें होतीस ? '

' कॉलेजांत—आतां सत्याग्रहांत, आमची तुकडी आली आहे इथें पिकेटिंगला—'

' कुठें राहणार तूं ? '

' विरुपाक्ष चेट्टीकडे—आम्ही सगळ्या तिथेंच उतरलों आहोंत, जातें आतां. मग भेटा मला—'

' तूं—तूं विरुपाक्ष चेट्टीकडे उतरणार ? '

तिचें लक्ष देखील नव्हतें, ती बाकीच्या पोरींसाठीं इकडेतिकडे पाहात होती. त्यांतल्या बऱ्याचजणी विरुपाक्ष चेट्टीच्या भपकेदार सेडान गाडींत चढून ती गाडी निघाली होती.

'हें काय–तुमच्याशीं बोलण्यांत माझी मोटर चुकली—'

'कामगाराचा खटारा चालत असला तर–माझी ट्रक आहे—'

निरुपायानें ती माझ्या खटाऱ्यांत माझ्या शेजारीं बसली.

मी गाडी सुरू करून स्टेशनाबाहेर काढली व विचारलें, 'कॉले-जची सोय वडिलांनींच करून ठेवली होती, होय?'

'नाहीं, बाबा अत्यवस्थ झाले तेव्हां विरुपाक्ष चेट्टीनीं त्यांच्याजवळ माझें शिक्षण कराण्याची हमी घेतली.'

'म्हणजे?'

'मॅट्रिक झाल्यावर त्यांनीं मला एक 'चाणाक्ी स्कॉलरशिप' म्हणून सुरू करून दिली—'

मीं कांहीं वेळ कांहींच बोललों नाहीं. शेवटीं विचारलें, 'माझी आठवण होते कां कधीं?'

'होते ना—'

'मला अजूनही तसच वाटत आहे—'

ती नुसती हांसली.

'तूं रोज समोर दिसत राहिली असतीस–तर माझी देखील एकादी लँडो गाडी असती–'

ड्रायव्हिंग व्हीलवर घट्ट दाबून ठेवलेल्या माझ्या हातांकडे ती पाहात होती. माझ्या हातांची मलाच थोडी लाज वाटत होती. जाड, राठ, केसाळ दोरखंडासारखे हात होते ते.

'माझी आठवण राहील का यापुढें—'

'मी कशी विसरेन?'

माझा डावा हात चाकावरून काढून मीं तिच्या हातावर ठेवला.

ती नुसती हांसली.

विरुपाक्ष चेट्टीचें घर आलें. कामाक्षी उतरली.

'तुम्ही नाहीं का आंत येत?'

'नको—विरुपाक्ष चेट्टीच्या घरांत मी येत नाहीं.'

तिनें क्षणभर माझ्याकडे पाहिलें. ती जाण्यासाठीं वळली, मीं विचारलें, 'पुन्हां कधीं भेट?'

'आतां मीं फार गडबडींत असणार—पिकेटिंगच्या.'

'तूं कोणत्या दुकानावर असशील—तिथें मी येईन. मी आंत जायला लागलों म्हणजे तूं माझी मनधरणी करशील!'

ती नुसती हांसून निघून गेली.

त्यानंतर पुष्कळ दिवस ती मला दिसली नाहीं. लौकरच कॉंग्रेसचें राज्य झालें. आमच्या जिल्ह्यांत दारूबंदी व्हायची असें ठरलें. पिणाऱ्या लोकांनीं गांवांत होती नव्हती तेवढी दारू पहिल्या तारखेच्या आंत खलास करण्याचा सपाटा चालवला होता. अजून 'दारू पीना हराम है' म्हणून मी आग्रह करणाऱ्या दोस्तांना चुकवण्यासाठीं गांवाबाहेर नदीवर एकटा फिरायला जात होतों.

एके दिवशीं संध्याकाळीं बराच उशीर होईपर्यंत मी नदीच्या कांठावर बसून राहिलों होतों. दुसऱ्याच दिवशीं दारूबंदी सुरू व्हायची म्हणून माझ्या दोस्तांची एक जंगी मैफल झडत होती—ती टाळण्याकरतांच मी नदीच्या बाजूला इतका वेळ काढीत होतों. मंद चंद्रप्रकाश होता. जग मोठें शान्त व सुंदर दिसत होतें. अशा रम्य वेळेला खडकावर माझ्या शेजारीं पाण्यांत पाय सोडून कामाक्षी बसलेली नाहीं म्हणून माझ्या पोटांत तुटत होतें. इतक्या सुंदर जगांत बाजूला मला सखी नसावी ही कल्पना मला अखेर असह्य झाली. मी उठून परत निघालों.

मी रस्त्यानें चार पावलें चाललों नाहीं तोंच समोरून एक मोटर आली. बहुतेक माझे दोस्त माझ्या शोधार्थ आले असतील या कल्पनेनें मी एका झुडपाआड झालों. ती मोटार जवळच थांबली. तिचे दिवे विझले. आंतून दोन माणसें उतरलीं. पहिल्यानें विरुपाक्ष चेट्टी उतरला, व आंतून

कोणालासा तो हात धरून ओढत होता. आंतून ती व्यक्ति अर्धवट खुषीनें बाहेर पडत होती. ती एक तरुण स्त्री होती, उतरतांना ती पुटपुटली, 'इथें नको–कोणी पाहील.'

तो कामाक्षीचा आवाज होता. विरुपाक्ष चेट्टी नुसता हांसला, मालकीच्या ऐटीनें त्यानें तिच्या गळ्यांत हात घालून तिला जवळ ओढली. तिची ना दिसली नाहीं. दोघें हळुहळू नदीकडे चालत गेलीं.

मी तेथून निघून झपाझप गांवाकडे चालूं लागलों. माझ्या डोक्यांत 'घणणणण' असा कांहींतरी चमत्कारिक आवाज होत होता. माझ्या इमानी निष्ठेला जी कामाक्षी मिळाली नाहीं ती विरूपाक्ष चेट्टीच्या पैशांना मिळाली होती. माझ्या जिण्यांत आतां शिस्तीची जरूर नव्हती. चांगलें राहायचें तें आतां कशासाठीं नि कोणासाठीं ? एखाद्या नशेंत चालल्यासारखा मी माझ्या वर्कशॉपकडे गेलों. टेबलांत होते नव्हते तेवढे सगळे पैसे काढले, व ते घेऊन तडक दारूच्या दुकानावर गेलों.

माझ्या दोस्तांनीं आनंदाच्या आरोळ्या देऊन माझें स्वागत केलें. दुकानांत गर्दी होती. मी माझे पैसे दुकानदारापुढें ओतले, दुकानांतल्या सर्वांना माझ्या खर्चानें एकेक ग्लास द्यायला फर्माविलें, व हातांत मावतील तेवढ्या बाटल्या घेऊन एका टेबलापाशीं बसलों.

नंतरचें मला कांहीं आठवत नाहीं.

सकाळीं तोंडावर पाण्याचा मार बसून मी जागा झालों. बाजारांतल्या कुठल्याशा दुकानाच्या पायरीवर डोकें ठेवून मी अस्ताव्यस्त पडलों होतों. डोळे उघडूनदेखील मला स्पष्ट दिसत नव्हतें. पुन्हां एक बादलीभर पाणी माझ्या तोंडावर कोणीतरी मारलें. मी उठून बसलों. भोंवतालीं बरींच माणसें हांसत खिदळत उभीं होतीं. पांढऱ्या शुभ्र खादीचे कपडे घातलेलीं, खप्पड, कांहीं पुढें दातांचीं, कांहीं चष्मे लावलेलीं छातीचे कोनाडे झालेलीं पोरें, फरारी गुन्हेगारांसारख्या चेहऱ्यांचे, वाढलेल्या दाढ्यांचे कांहीं गलेलठ्ठ टोणगे, कोंबड्यांसारख्या बेढब अंगाच्या कांहीं केशरी गांवभवान्या—हीं सगळींजणें फिदिफिदी हांसत, कोणी केंकाटत, कोणी खिंकाळत होतीं. मला माझ्या पायावर उभें राहण्याइतकी शुद्ध

असती तर माझ्या डोळ्याला डोळा द्यायची यांतल्या कोणाची ताकद झाली नसती—पण मी नशेनें लाचार झालों होतों, एखाद्या आसन्नमरण जनावरासारखी माझी स्थिति झाली होती. माझे हातपाय चालत नव्हते व बुद्धि बधिर झाली होती.

कोणीतरी माझा हात धरून मला उठून उभें केलें. मला अर्धवट ढकलीत तो घोळका चालवूं लागला. त्या भेकड मेषपात्रांना संख्येच्या बळानें आणि माझ्या दुबळेपणामुळें वीरश्री चढली होती. मला धक्के मारीत, गचांड्या देत ते चालवीत होते. ज्यांच्यासारख्या पन्नासजणांना मी नुसत्या दोन हातांनीं लोळवलें असतें तेच माझ्या अवस्थेमुळें धीट होऊन माझी विटंबना करीत होते. हाडकुळ्या हातांच्या चपराका मधूनमधून माझ्या तोंडावर पडत होत्या. केंसाळ हातांच्या हिंडिंबा माझे लचके तोडीत होत्या.

अखेर आम्ही एका गर्दीच्या ठिकाणीं आलों. पांढऱ्या कपड्यांची तेथें दाटी झाली होती. मध्येंच एक निशाण उभारलें होतें. त्याच्या पायथ्याशीं कांहीं माणसें उभीं होतीं. मला थेट त्यांच्यापर्यंत ढकलण्यांत आलें.

'हा आला सरकारी दारूबाज !' कोणी ओरडलें. हंशा पिकला. 'सरकारी दारूबाज !' असे शब्द सगळीकडून निघूं लागले. मला कोणीतरी शेवटचा धक्का दिला. मी धडपडत निशाणाच्या खांबावर जाऊन आपटलों. माझ्या डोक्यांत झिणझिण्या आल्या. मी जबरदस्त प्रयत्नानें डोळे उघडून भोंवतालीं पाहिलें. हेटाळणीनें हांसणारे सद्‌गुणी माणसांचे दांत सगळीकडे चमकत होते. थोडी शांतता झाली. एक मनुष्य व्याख्यान देऊं लागला.

तो विरुपाक्ष चेट्टी होता. त्याच्या सावलींत सेविकेच्या पोषाखांत कामाक्षी उभी होती. माझी तिची निमिषभर नजरानजर झाली, तिनें भुंवया उंचवून दुसरीकडे पाहिलें.

विरुपाक्ष चेट्टी सत्य, अहिंसा, म्हणून कांहीं तरी बोलत होता. लोक मधूनमधून टाळ्या देत होते. अखेर तो माझ्याकडे वळला, लोकांत पुन्हा हंशा झाला; तो म्हणाला कीं 'आजच्या दिवसापासून हे असले नमुने दिस-

णार नाहींत. माणसाला पशु बनविणाऱ्या दारू राक्षसीची आज उत्तरक्रिया आहे आणि ती तिच्या अशा आवडत्या पुत्राकडून व्हायला नको काय ?' टाळ्यांचा कडकडाट झाला. शेवटच्या बाटलीच्या रूपानें दारूचा कायमचा नाश करण्यासाठीं ती बाटली कोणीतरी माझ्या हातांत दिली व 'फोड' म्हणून सांगितलें.

मी ती बाटली विरुपाक्ष चेट्टीच्या कपाळावर फोडली. अडकित्त्यांत फोडलेल्या अक्रोडाच्या कवचीसारखी त्याची कवटी तडकल्याचा आवाज आला, त्यानें माझे कान संतुष्ट झाले. त्या नरपिशाच्चाच्या फुटलेल्या डोक्यांतून वाहणाऱ्या नीच रक्तापेक्षां फुटलेल्या बाटलींतून ओघळणारी दारूच माझ्या डोळ्यांना जास्त शुद्ध दिसली.

माझें कृत्य पाहून कामाक्षी बेशुद्ध होऊन मागें पडली. ती उभी असती तर कदाचित् मी तिलाही ठार मारलें असतें....

———

आजचा दिवस वाईट आहे अशी कांहींतरी अस्पष्ट कल्पना लुलूला सकाळपासूनच होती. मालकमालकिणीच्या वागण्यांत आज कांहींतरी फरक पडलेला होता. लुलू स्वयंपाकघरांत डोकावली तरी मालकिणीनें तिला हाकललें नाहीं; पावाचा तुकडा बैठकीवर घेऊन गेली तरी मालक कांहीं बोलला नाहीं; उलट राजा एकदा तिच्या अंगावर ओरडला तेव्हां त्यालाच मालकीण रागें भरली.

दिवस जसजसा वर यायला लागला तसतशी लुलू जास्तच अस्वस्थ व्हायला लागली. आज तिच्याशीं कोणी खेळेना. मधूनमधून एकएक एकएक माणूस येऊन तिला कुरवाळून जायचें, तिच्या आवडीचा खाऊ तिला द्यायचें, पण रोजच्यासारखा खेळ, दंगामस्ती वगैरे कांहीं नाहीं; संध्याकाळ व्हायला लागली तसतशी लुलू फारच हवालदील झाली. 'उं ऽऽऽऽऽऽ' असें केविलवाणे शब्द वरचेवर ती काढूं लागली. कोणी बोललें कीं आशेनें त्याच्याकडे पाहून शेंपूट हालवायची पण त्या माणसानें दुसरीकडे तोंड फिरविलें कीं पुन्हां पुढच्या दोन पंजांत डोकें ठेवून पडून राहायची. तिच्या डोळ्यांत इतका खेद भरला होता कीं मालकिणीची व तिची एकदां दृष्टादृष्ट झाली तेव्हां मालकिणीच्या डोळ्यांतून पटकन् दोन अश्रू पडले. मालकिणीनें चटकन् वांकून तिला उचलून घेतलें व आपल्या हृदयाशीं धरलें, त्यावेळेस लुलूनें एकच आर्तस्वर काढला. त्या स्वरानें मालकिणीच्या हृदयाचें पाणी झालें–परस्परांना कळून चुकलें कीं घटका भरत आली.

रात्रीं कोणी जेवायला तयार होईना–राजा देखील ! लुलू आपल्या अन्नाला न शिवतां निश्चल बसून राहिली होती. अखेर दहा वाजले. तिच्या

मालकानें उठून कपडे घातले. मुद्दाम कठोर आवाज काढून तो म्हणाला, ' चला वेळ झाली—'

मालकिणीनें पुन्हां एकदां लुलूला कवटाळलें, तिच्या दोन्ही डोळ्यांतून अश्रूंचे पूर वहात होते. ती चमत्कारिक आवाजांत लुलूच्या कानाशीं बोलली ' बाळा, आम्ही आतां गरीब झालों म्हणून तुला सोडणार बरं—' लुलू तिला जास्तच बिलगली.

मालकानें सायकल तयार केली. तिच्यावर बरेंचसें कांहीं सामान बांधलें, व दृष्टी फिरवून लुलूला अलगद मालकिणीकडून काढून घेतलें. तिला एका खांद्यावर मुलासारखें घेऊन तो सायकलवर टांग टाकून बसला. इतक्यांत डुलकींतून जागा झालेला राजा धांवत आला व म्हणाला—' दादा, माझ्या लुलूला कुठें हो घेऊन चाललांत ?' त्याला उत्तर न देतां मालकानें सायकल जोरांत सोडली. राजाला कडेवर घेऊन त्याची आई आंत गेली व तिनें त्याची गद्गद आवाजांत समजूत घातली. ' लुलूला किं नाहीं बाबा, आपल्या काकांकडे पोहोंचविताहेत, त्यांना सोबत नाहीं ना कोणी ! म्हणून '

सायकल जोरानें चालली होती. मालकानें डाव्या खांद्याला लुलूला घट्ट धरलें होतें व तो तिच्याशीं हळूहळू बोलत होता, ' गरिबीचा आणखी एक बळी—आम्ही आतां दुसरीकडे राहायला जाणार लुलू—स्वस्त जागेंत—तिथें कुत्रीं खपत नाहींत बरं. तुझा कोणाला त्रास होईल. घाण होईल, विटाळ होईल. तुलाही बागडायला जागा नाहीं. धुवट गरिबांच्या वस्तींत कुत्रींसुद्धां चैनीच्या वस्तू होतात—तुझें दुर्दैव म्हणून तुला आमच्यासारखीं भिकार माणसं मिळालीं. आतां याशिवाय मार्ग नाहीं. तुला कोणी ठेवायला तयार नाहींत—तूं सुंदर नाहींस, फॅशनेबल नाहींस म्हणून. साहेबलोकांसारखें तुला मारून टाकणंही माझ्याच्यानं होत नाहीं. मीं तुला देवाच्याच राज्यांत सोडून देतों आहे. तो तुला सुखी ठेवील तुझ्या नशिबीं सुख असलं तर—' लुलूनें डोकें उचलून मालकाचा गाल चाटला.

मुद्दाम वेडेवांकडे, आडवेतिडवे रस्ते, वळणें, वगैरे घेऊन गांवापासून सुमारें दहा मैलांवर रानांत सायकल उभी राहिली. लुलूच्या माल-

कानें तिला खालीं सोडलें. रस्त्यापासून थोडें आंत तो गेला. बरोबर आण-लेल्या सामानांतून, लुलूचा जुन्या ब्लँकेटचा बिछाना एका झाडापाशीं त्यानें घातला; तिच्या थाळींत तिच्या आवडीचे पदार्थ भरून ठेवले-बाटलींतल्या पाण्यानें दुसरी थाळी भरली. लुलूला एका ( अर्ध्या तासांत तोडतां येईलशा ) दोरीनें त्यानें झाडाला बांधलें व तिच्या कपाळाचा एक मुका घेऊन तो उठला.

'हें तूं माझ्यामागें येऊं नयेस म्हणून—देव तुझं रक्षण करो.' चटकन् सायकलवर उडी टाकून तो पळाला—पण लुलूची शेवटची करुण किंकाळी त्याला ऐकूं आलीच—

—आणि चार पांच मैल शहराकडे गेल्यावर एका झाडाला साय-कल टेकून रस्त्याच्याकडेला बसून तो मनुष्य एकाद्या लहान मुला-सारखा रडला.

---

# दक्षिण वायु



अ–ल–का–व–ति...

कंटाळलेल्या डोळ्यांनीं, अर्धवट नकळतच त्यानें स्टेशनाचें नांव वाचलें. दिवसभर गाडीचा प्रवास झाल्यावर व सगळी रात्र पुन्हां गाडींतच जाणार असल्यावर, संध्याकाळीं माणसाची जी केविलवाणी अवस्था होते ती त्याची झाली होती. त्याचें आंग अगदीं आंबून गेलें होतें. एक प्रकारचा सुन्नपणा त्याच्या डोक्याला आला होता. त्याला खाणें पिणें किंवा धूम्रपान यांत देखील कांहीं गोडी राहिली नव्हती. सूर्यास्ताची शोभा–जी पाहण्यासाठीं शहरांतले लोक जिवाचा एवढा आटापिटा करतात–तीं गाडींतून सहजगत्या दिसत असतां देखील त्याच्या ध्यानांत येत नव्हती. त्याच्याजवळचीं सगळीं वर्तमानपत्रें वाचून झालेलीं होतीं.

—आणि या कंटाळ्याच्या कैफांत कितीहि सरस मजकूर समोर आला असता, तरी त्यानें डोळे मिटूनच घेतले असते. हातपाय पसरायला जागा असूनही गाडींतल्या रूढीला अनुसरून त्याला झोंप येत नव्हती. गोडी लागण्यासारखीं किंवा चीड येण्यासारखींदेखील कोणी माणसें त्याच्या डब्यांत नव्हतीं. त्यामुळें मोठ्या स्टेशनाजवळ जातांना गाडीची झालेली 'रडत्–खडत्' गति त्याच्या ध्यानांत आली नाहीं. स्टेशनचा पसारा सुरू होण्याच्या आधीं, करकरीत तिन्हीसांजाच्या अंधुक प्रकाशांत, एक लहानसें तळें व त्याच्या आसपासची झाडी पाहून त्याला कांहींही वाटलें नाहीं. गाडी स्टेशनाच्या हद्दीजवळ पोहोंचेपर्यंत त्याचें लक्ष आजुबाजूला असतें, तर त्यानें खडबडून उठून, डोळे फाडून कांहीं कांहीं ओळखीचीं स्थळें न्याहाळलीं असतीं, पण तो पूर्ण उदासीन होता.

—त्या स्टेशनाचे नांव वाचीपर्यंत; नाइलाजानें वाचलेलें तें नांव त्यानें पुन्हां डोळे फाडून लक्षपूर्वक वाचलें, अलकावती.

एकाएकीं त्याचा सगळा आळस पार नाहींसा झाला. चटचट त्यानें आपलें सामान गोळा करण्यास सुरवात केली. थोड्याच वेळांत कपडे घालून तो खालीं उतरला. मुंबईचा उतारू मधेंच कां उतरतो या इतरांच्या फुकट पंचायती तोंडावाटे बाहेर पडण्याच्या आंत तो आपली बॅग व वळकटी घेऊन चालूंही लागला. प्लॅटफार्मवरच्या चहावाल्याकडे थोडें गोड बोलून त्यानें आपलें सामान ठेवलें व लौकरच तो स्टेशनाबाहेर पडला.

त्या रात्रीं पौर्णिमा होती. दिवेलागणीलाच रस्त्यातल्या धुळींतून फिकट चन्द्रप्रकाश ओळखूं येत होता. चन्द्राखेरीज प्रवाशाचें लक्ष कोठेंही नव्हतें. स्टेशनजवळच्या वस्तींत वाढ झाली आहे किंवा रस्त्याचें स्वरूप बदललें आहे, हें त्याच्या गांवींही नव्हतें. पायाला जमीन जणूं काय लागतच नाहीं इतक्या बेभान अवस्थेंत तो चालला होता. तें नांव वाचल्यापासून त्याच्या ठायीं उत्पन्न झालेला एक अपूर्व उन्माद या रस्त्यानें चालतां चालतां पुरत्या भरांत आला होता. तो मुद्दाम अमुक दिशेनें जसा जातच नव्हता. उपजत बुद्धीनें त्याचे पाय त्याला त्या रस्त्यानें नेत होते. रोजच्या चालीनें मळलेल्या वाटेसारखें त्याच्या पायाखालचें अंतर मागें धांवत होतें. रस्त्याच्या कडेला ठळक इमारती, झाडें, दुकानें, जिथल्या तिथें आहेत, यांत त्याला विशेष कांहींच वाटत नव्हतें; क्वचित् कोठें तरी फरक झालेलें ठिकाण असलेंच तर तें त्याचे डोळे आपोआप वगळीत होते. तो चालतच होता. त्याची दृष्टि धुंद झाल्यासारखी अर्धस्फुट पापण्यांतून शून्यांत पहात होती. त्याची मुद्रा भौतिक उपाधींच्या पलीकडे गेलेल्या एकाद्या योग्या-सारखी प्रसन्न पण खिन्न होती.

सुमारें पंधरा मिनिटें चालल्यावर तो एका पडीक बंगल्यापाशीं आला. गांवकऱ्यांच्या हौसेची दिशा बदलल्यामुळें वीस वर्षांपूर्वीची या बाजूची फॅशनेबल वस्ती आतां गांवाच्या दुसऱ्या टोंकाला गेली होती. जीर्ण बंगल्यांचीं एक विसरवाडी म्हणूनच हा शहराचा भाग शिल्लक राहिला होता. जुन्या धर्तीच्या एकदां टुमदार असलेल्या इमारती, आतां अस्ता-व्यस्त झालेल्या आपापल्या बागांतून आपली दीनवाणी इभ्रत बचावण्याचा हताश प्रयत्न करीत होत्या. एका काळच्या अमलदारी सरंजामांत त्या पांच-

सहा बंगल्यांचा डौल और असला पाहिजे; त्यांचे भव्य वाटोळे खांब शुभ्र सफेती दिल्यामुळें गंभीरपणें उभे असतील, त्यांचीं उंचच उंच गवती छपरें मोठीं नीटनेटकीं दिसत असतील, व्यवस्थित निगा ठेवलेल्या बागांतून ते एकमजली बैठे बंगले सुख, शान्ति आणि समृद्धि सुचवीत असतील; पण पण आज सगळा देखावा त्या उदार मन्द चन्द्रप्रकाशांतसुद्धां आपली जीर्णावस्था झांकूं शकत नव्हता. तो कोपऱ्यावरचा बंगलासुद्धां जंगल माजलेल्या त्या बागेंत बेचिराख उभा होता.

पण प्रवाशाच्या दृष्टीला तें कांहीं दिसलें नाहीं. त्याला त्या सर्व वातावरणांत वीस वर्षांपूर्वींपेक्षां कांहीं फरक झाला आहे असें वाटलें नाहीं. त्याच्या दृष्टीला आजूबाजूचे बंगले पूर्वींचेच सुखनिवास होते. कोठून फोनोच्या संगीताचे स्वर, कोठून मुलांच्या हास्याच्या लकेरी, केव्हांही ऐकूं येतील अशी त्याची खात्री होती. त्या बंगल्यांतून स्वच्छ विजेच्या प्रकाशांत सुखी माणसें वीस वर्षांपूर्वींप्रमाणेंच आपआपल्या गृहजीवनांत निमग्न असतील याबद्दल त्याला शंका नव्हती. त्या कोंपऱ्यावरच्या बंगल्याचें फाटक, त्यानें आंत हात घालून संवय असल्यासारखी कडी काढून उघडलें. ती कडी मोठ्या कष्टानें निघाली, फाटकही बिजागऱ्यांची कुरकूर करीतच मागें गेलें—पण हें फाटक नेहमींच असें त्रास देत असे. आपल्यामागें तें बंद करून तो सावकाश बंगल्याकडे जाऊं लागला. दुतर्फा कडुलिंबाच्या मोहरानें त्याचें स्वागत केलें. बागेंतल्या कुंड्या केव्हांच नाहींशा झाल्या होत्या, पण त्याच्या हट्टी स्वप्नदृष्टीला त्या नाहींत असें वाटलें नाहीं.

दोन ढांसळलेल्या पायऱ्या चढून तो बंगल्यापुढच्या कारंज्यापाशीं गेला. हौदाच्या पाण्यांत पाय सोडून बसायचें त्याच्या मनांत आलें, पण कारंज्याचा कट्टा बसण्यासारखा नव्हता, हौदांत पाणी नव्हतें, कारंज्याचा एक खुंट काय तो शिल्लक होता. तो तेथें उभा राहिला असतांना त्या कोरड्या हौदांतून एक बेडूक उडी मारून दुसरीकडे निघून गेला. वीस वर्षांच्या कालगतीची ही जाणीव त्याला असह्य झाली. तो तेथून दुसरीकडे जाऊं लागला, बंगल्याकडे वळलासुद्धां नाहीं—बंगल्यांत त्याचें कांहीं नव्हतें; डाव्या हाताला औटहौसेस म्हणून तीनचार खोल्यांची बराक होती तिकडे तो वळला.

मेंदीच्या रांगेंतून वाट काढून जातांना त्याला पुन्हां आपण आपल्या इच्छित जगांत आल्यासारखें झालें. घाईघाईनें जाऊन आपल्या खोलीचें दार धाडकन् उघडावें असें त्याला वाटलें—

पण त्या घाईत आपल्या शरीरांत तारुण्याचा लवचीकपणा राहिला नाहीं ही क्रूर जाणीव त्याला झाली. तेवढ्यांत क्षणभर त्याची धुंद दृष्टि निवळून भोंवतालचें निष्ठुर सत्य त्याला दिसलें—आणि त्याची खोली तरी कुठें राहिली होती! दार अजिबात नव्हतें व चांदण्यांत त्याला दिसलें कीं आंतली फरशी ठिकठिकाणीं उडून तेथें गवत माजलेलें होतें. खोलीपुढच्याच ओट्यावर तो टेकला. दोन्ही हातांत डोकें धरून डोळे घट्ट मिटून आयुष्याच्या घड्याळाचे काटे वीस वर्षें मागें ढकलण्याची त्यानें शिकस्त केली; इतक्यांत मंद वाऱ्याची झुळूक येऊन गेली.

अहाहा, दूरवरच्या माळरानावरूनच हा वारा आपल्या अंगाशीं असा खेळत होता, दक्षिणवायु—

उहूहू—काय थंडावा आला एकदम हवेंत, अंगांत कांहीं गरम असतं तर बरं—

वीस वर्षांच्या अंतराचे दोन विचार त्याच्या डोक्यांत लागोपाठ आले. वीस वर्षें तुटल्याची त्याला चीड आल्यासारखें झालें; पुन्हां तो वयस्क सुविचार सांगूं लागला,

आतां चाळिशीची उमर झाली. थंडींत सांधे दुखूं लागले, प्रकृतीची काळजी घेण्याचे दिवस हे—

काळजी! काळजी हा शब्दसुद्धां आपण ऐकलेला नव्हता—निष्काळजी म्हणून बोलणींही खात होतों आपण! याच दिवसांत पहिल्यानें आपण अलकावती पाहून गेलों; गम्मत वाटली होती थोडे दिवस, पण पुन्हां नौकरीच्या निमित्तानें यायची वेळ लगेच मुंबईला परत गेल्यावर महिन्यानें आली, तेव्हां इथें यायची बिलकूल हौस नव्हती आपल्याला. मोठ्या नाखुषीनें आलों—पावसाळ्याच्या सुरुवातीचे दिवस होते. आपल्याला हळूहळू इथें राहणें बरें वाटायला लागलें.

शेजारींच-या बराकीच्या दुसऱ्याच भागांत तिची मंडळी रहायला आली होती.

मुंबईची तोंडओळखीचीं तीं माणसें होतीं. तिचे चमत्कारिक म्हणून प्रसिद्ध असलेले वडील, तिचा थोरला भाऊ, ती आणि इतर मुलेंबाळें...

खेळाडू म्हणून त्या मुलांची आपल्यावर फार भक्ति, जाणेंयेणें सर्रास सुरूं झालें. ते 'चमत्कारिक' गृहस्थदेखील किती खूष आपल्यावर.

ती मात्र सुरवातीला अबोल पण सस्मित होती.

इंदू......

तिच्याशीं एकदां बोलायला लागल्यावर मात्र मोकळेपणानें बोलायची. निष्पापपणानें बोलायची. त्या आकाशासारख्या निळ्या डोळ्यांची नजर किती नैसर्गिक-किती निरभ्र, किती बेडरपणाची-आणि विश्वासाची. आपल्याला त्या डोळ्यांची थोडी भीतीच वाटायची, तें तेजस्वी सौंदर्य भीति वाटण्यासारखेंच होतें. विस्तीर्ण कपाळाला तिरपा भांग पाडलेल्या भुरकट केसांची सहजमनोहर सीमा, लालसर छटा असलेले उंच गाल, सरळ पण लहानशी नासिका, रेखीव भरदार ओठांची जिवणी, ती गोल मान, यौवनाच्या तसकांतीची ती बांधेसूद आकृति, ती ताठ निर्भय चाल व खंबीरपणाची, आत्मविश्वासाची ती मुद्रा, अनेक जन्म झाले तरी आपल्याला विसरणें शक्य नाहीं......

ती शाळेंत जात असतां आपणही नौकरीवर त्याच बाजूला तिच्याबरोबर जात होतों-आणि तेवढ्यावर तिच्याबद्दल आपल्याला एक प्रकारची मालकी वाटायला लागली ! आपल्याशिवाय ती कोठें मुलांमध्यें जात असे म्हणून तिला आपण Tom boy-मर्दानी मुलगी म्हटलें. तें तिला फार लागलें, व आपल्याला आसुरी आनंद झाला ! पण परस्परांतली वागणूक थंडावायला तेवढेंच कारण पुरलें आणि तें जास्त पेटवायला आपलें चेवल्यासारखें वागणें कारण झालें. बेछुटपणा दाखवणें आपल्याला मोठी फुशारकी वाटत असे; पण आपल्या वागणुकीकडे ती तिरस्कारानें पाहाते अशा नुसत्या संशयानें आपल्याला घेरल्याबरोबर आपण घाबरलों, आपला आत्मविश्वास पार ढांसळला, आपण लब्धप्रतिष्ठितपणानें वागायला लागलों,

'शिष्ठ' होण्याचे फोल प्रयत्न केले, व्यक्तित्वाचें वजन पाडण्याची खटपट केली.

किती लहान, किती मूर्ख–आणि किती निर्लेप होतों आपण तेव्हां...

तिच्या तेजापुढें अजिबात फिकें पडलों आपण. आपला 'उणेपणा' जाणवूं लागला. बुद्धींत ती कांहीं कमी नव्हती, पण तिच्या सौंदर्याच्या तोडीला आपल्याजवळ कांहींच नव्हतें–हिंमत, हिकमत–थोडक्यांत म्हणजे पुरेसा मर्दपणा नव्हता. तिच्याशीं तेढ धरणें सुटल्यावर आपल्यावर एकदम प्रतिक्रिया झाली, स्वतःला आपण नालायक समजूं लागलों—

तिला एकदम देवी बनविलें–आणि तेव्हांच आणि तेव्हांच प्रेमाची समाधीहि बांधली. अंगचा करंटेपणा दैवानें दिलेलीं सुखें चाखायचीहि अक्कल देत नाहीं! जाऊं द्या, आपण येथें पश्चात्ताप करायला नाहीं आलों–वीस वर्षें झालीं त्या गोष्टीला—

वीस वर्षें! आपणही विशीच्या सुमाराला होतों–अक्कल मात्र दहाव्याच वर्षाजवळ हट्टून बसली असावी त्यावेळीं! तिला आपण देवी बनविलें आणि स्वतंत्र व्यक्तित्वाला मुकलों. आपण दुबळेपणाची कबूली न बोलतां दिली. पण तिनें मात्र शब्दानें देखील आपल्याला दुखावलें नाहीं. तिची योग्य, अचूक वागणूक कधीं बदलली नाहीं.

दिवाळीला आपण मोठ्या चमत्कारीक मनःस्थितींत मुंबईला आलों. निघालों सुटी चैनींत घालवायला म्हणून, आणि गाडी अलकावतींतून निघाल्यापासूनच पोटांत तोडूं लागलें. निघतांना त्यांच्या घरीं विचारायला गेलों तेव्हांचे तिचे डोळे सारखे समोर यायला लागले. गाडींतून एकद हिरवागार रम्य, मळा त्यांत एकादी बंगली दिसली, कीं अशा ठिकाणीं आम्ही दोघे कधीं राहूं का असा विचार येई. इतका अप्रिय प्रवास जन्मांत कधीं झाला नव्हता. मुंबईहून आणखी दूर साताऱ्यास गेलों, तों अलकावतीहून हजारों मैल दूर आल्यासारखें वाटलें. एखाद्या दुसऱ्या, रुक्ष जगांत आल्यासारखें वाटलें. बायकांविषयीं आपलें औदासिन्य पाहून कित्येकांनीं तसें बोलूनही दाखविलें. कसलीशी कादंबरी—प्रेमकथा–वाचीत होतों आपण

तेव्हां, त्यांतल्या नायकनायिका आपल्याच जोडीला आपण बसल्यामुळें ती फार आवडली होती तेव्हां आपल्याला. तिकडे असतांनाच आपल्याला इतक्या दिवसांच्या विस्कळित, ध्येयहीन आयुष्याबद्दल उपरति झाली ! स्वतःला सुधारण्याच्या अनेक योजना घेऊन आपण रजेंतून परत आलों.

परत आल्याचा आनंद ओसरल्यावर आपण निश्चय केला कीं स्वतःला तिच्या पुरतेपणीं अनुरुप केल्याखेरीज तिचा विचारही करायचा नाहीं ! मग आपण गंभीरपणें आंखलेल्या आयुष्याचें कठोर व्रत सुरू केलें. असें वाटतें कीं त्या प्रगाढ आणि रूक्ष वाचनानें किंवा भारदस्त वागण्यानें आपण जितका परिणाम केला त्यापेक्षां आपल्या तालीमबाजीनें जास्त केला असावा—आतां वाटतें !

पण प्रियाराधनला सुरवात अनपेक्षितपणेंच झाली. किती क्षुल्लक प्रसंग आणि क्षुल्लक कारण ! त्यांच्या घरीं एकदम पुष्कळ पाहुणे आले म्हणून त्यांनीं काकांकडे परस्पर वशिला लावून, आपली उचलबांगडी मुख्य बंगल्यांत केली. काय रागाचा आव आणला होता आपण ! कधीं न हंसतां बोलूं लागलों त्या लोकांशीं—सगळा राग तिला दाखविण्यासाठीं—कर्मधर्मसंयोगानें त्या बिचारीला तात्पुरती तीच खोली दिली होती त्यांनीं अभ्यासासाठीं—

दुसऱ्याच दिवशीं कांहीं आणायला म्हणून सकाळींच आपण त्या खोलींत गेलों, आणि ती झटकन् बाहेर गेली. टेबलावरच्या एका कागदावर तिनें लिहिलें होतें,

'माझ्यावर रागावलांत का तुम्हीं ?'

या प्रश्नाचें उत्तर द्यायला बराच वेळ लागला. त्यावेळीं तसेंच बाहेर पडलों आपण, पण हृदयांत आशेनें एकदम केवढी उचल खाल्ली होती ! दुसऱ्या दिवशीं चमत्कारिकबुवांनींच सांगितलें, कीं तुमच्या ऑफिसचें काम तुम्ही आपल्या खोलींतच करा, आमच्या मुलांचा अभ्यास अगदीं मुकाट्याने चालेल. आपण गेलों तेव्हां ती खोलींत एकटीच वाचीत बसली होती. आपण समोरच टेबलाच्या दुसऱ्या बाजूला बसून कांहीं कागद चाळले. मग हलक्या अस्पष्ट आवाजांत म्हणालों,

'कालचा प्रश्न मलाच होता ना'

'हो,' पुस्तकाआडून उत्तर आलें.

'त्याचं उत्तर देऊं का?'

'काय?'

'तुझा राग येणं शक्य तरी आहे?'

गालांवरचा रक्तिमा हळूं हळूं डोळ्यांपर्यंत चढलेला आपण पाहिला. टेबलावरचा हात ओढून हातांत घेण्याची ती वेळ होती.

पण या देवतेला आपल्या स्पर्शानें भ्रष्ट करायचें? भलतेंच! तथापि आपल्या मनानें आनंदाची केवढी भरारी घेतली तेव्हां! जग एकदम किती सुंदर दिसूं लागलें, आयुष्य किती रमणीय वाटूं लागलें—

ते स्वर्गीय दिवस कधींही विसरणें शक्य नाहीं. नुसता सकाळीं जागें होण्याचा अनिवार हर्ष होत होता, कीं दिव्यसुखाचा आणखी एक दिवस! बिछान्यांत पडूनच आपल्या सुखाची धन्यता अनुभवण्यांत आपण मशगूल होतों. हृदयाबरोबर शरीर साध्या व्यवहारांतही नाचतबागडत होतें. निसर्गाच्या किमान सौंदर्यावरच आपण बेहद्द खूष होतो, आकाशाचा गडद निळेपणा, झाडांच्या पानांची मन्द हालचाल, पक्ष्यांची किलबिल, अशा क्षुल्लक गोष्टीदेखील आपल्या आनंदांत भर घालीत होत्या. कोणतीही अवघड गोष्ट साधणें म्हणजे हातचा मळ वाटत होता. क्रिकेटच्या मैदानावर, टेनिसकोर्टावर, केवळ ती पहात आहे या जाणिवेनें किती पराक्रम केलें आपण! आपल्याला सर्वजणें आवडत होतीं, आपण सर्वांना आवडत होतों, (All the world loves a lover ही म्हण फार नंतर पटली आपल्याला) तरी प्रेमाची आणभाक अजून तितक्या स्पष्ट शब्दांत झाली नव्हती. सगळा कारभार पटलेल्या ओळखीवर, मिळालेल्या ओझरत्या क्षणांत पुटपुटलेल्या शब्दांवर व चिठ्यांवर चालला होता. जेव्हां नाताळच्या सुट्टींत दोनच दिवसांच्या ताटातुटीचा प्रसंग आला तेव्हां मात्र जाणवलें. दिवाळीच्या वेळीं जातांना नुसते संथपणें पाहणारे निळे डोळे यावेळीं 'कशाला जातां?' असा मूक प्रश्न कळवळून करीत होते! आणि त्या दोन दिवसांत, त्या

परगांवीं एकान्त ठिकाणीं जाऊन, आपण एकाद्या अनाथ लेकरासारखे विरहाचे अश्रू ढाळले...

किती लहान, कच्चे—आणि निष्पाप होतो आपण तेव्हां !

परत आल्यावर जातांजातां ओझरतें तिनें हळूंच सांगितलें, 'दोन दिवस काय केलंत ते सगळं लिहून सांगा मला.'

आपल्या कामाची आणि तिच्या शाळेची वेळ आतां जमत नसल्या-मुळें बोलायला अवसर फार थोडा मिळत होता. आपण तिला लिहून वर्णनें लिहिलीं 'मीं असंख्य यातना भोगल्या, मला तुझ्याशिवाय जिवन्त राहणें देखील शक्य नाहीं—'

त्यावर तिचें उत्तर आलें, 'वेळ आली तर मी उघडपणें सांगेन कीं, आपलीं हृदयें एकमेकांचीं आहेत. मी आजन्म तुमची आहें !'

जगांत मनुष्याला आणखी काय पाहिजे ?

—असें कांहीं दिवस आपल्याला वाटलें. आम्ही एकमेकांचे आहोंत ही गोड जाणीव कांहीं काळ पुरली. पण मग—मग एक चमत्कारिक रुखरुख सुरू झाली. तिच्या सहवासाची भयंकर तृष्णा उत्पन्न झाली. घरीं, दारीं, करमणुकीचे ठिकाणीं, गांवाबाहेर तळ्याजवळच्या रम्य ठिकाणीं, तिच्यावांचून सगळें सुनें वाटायला लागलें. चांदण्यानें शरीराचा अक्षरशः दाह व्हायला लागला. इन्दू अगदीं जवळ हृदयाशीं घट्ट धरलेली कायमची असावी असें वाटूं लागलें—पण आलिंगनाची कल्पना म्हणजे पवित्र प्रेमाला डाग लागणें ही आपली तेव्हांची श्रद्धा, चुंबन म्हणजे पाप, नुसते हात हातांत घेऊन, तिच्या दृष्टीला दृष्टी भिडविणें म्हणजे अधःपात—या आपल्या शुद्ध प्रेमाच्या व्याख्या त्यावेळीं होत्या—शुद्ध प्रेमाच्या व्याख्या !

उभ्या देहाची तळमळ होत असतां, मीलनाची भूक लागली असतां, तारुण्य ओढ घेत असतां, 'दैवी' 'निरपेक्ष' 'वांछारहित' 'निष्पाप' 'शुद्ध' प्रेमासाठीं आपण ती दाबून टाकीत होतों—

कारण तिला देवता बनविली होती !

असा स्वतःवर आणि आपल्या प्रेयसीवर नैसर्गिक ऊर्मि मारून टाकण्याचा अत्याचार जगांत फक्त एकाद्या पागल कवीनेंच केला असेल! शुद्ध अशरीरी प्रेम! केवळ पुस्तकांच्या, नवलकथांच्या, काव्य–कल्पनेच्या सृष्टींत जगणाऱ्या एकाद्या रोगट मेंदूच्या माणसानेंच ही भयंकर कल्पना काढली असेल–आणि त्या कल्पनेच्या आपण पुरते आहारीं गेलों–कारण आपलें पुळचट मन, शून्य व्यक्तित्व.

तिचे तर हाल किती झाले असतील ही कल्पनाच करवत नाहीं; एकदांही हातांत हात घेण्यास न धजणारा, हुकमी प्रेरणेनें दृष्टीला दृष्टी खिळवून न ठेवणारा, हट्टीपणानें ओढून न घेणारा, हनुवटी वर करून चुंबनानें ओठ अडवून न ठेवणारा, गाढ आलिंगनानें चराचर सृष्टीचा विसर पाडण्यास असमर्थ–असा तिचा वल्लभ होता! भेटीचे नाना मार्ग शोधून काढण्याइतकी त्याची बुद्धि जिवंत नव्हती, भेटीचा विनियोग मीलनांत करण्याइतकी त्याची हिम्मत नव्हती, विरहाच्या वेदना शान्त करण्याइतका शीतल अखंड प्रेमरशनेचा प्रवाह त्याच्याजवळ नव्हता...

कारण आपल्या देवतेच्या आपणच दिलेल्या तेजानें आपण दिपलों होतों. भावना फोंफावून कृतींत उतरण्याइतकी जीवनशक्ति आपल्यांत नव्हती. ज्या बाहुबलानें तिचें हृदय जिंकलें, त्या बाहुबलानें तिच्या शरीराचें पारितोषिक घेण्याइतकें प्रबल हृदय आपलें स्वतःचेंच नव्हतें! आपल्याला माहीत नव्हतें कीं, स्त्री कधीं प्रीतीचें प्रतीक देत नाहीं, तें घ्यावें लागतें. व्यक्त प्रेम हें फुलवून वास घेण्याचें कुसुम आहे, प्रेयसीचें हृदयदान हें तिची मूर्ति जिंकण्यासाठीं आव्हान आहे....

आपल्या कमकुवत मनाची असंतुष्टता हळु हळु वाढत गेली. आपण कलहाला निमित्त शोधूं लागलों, तिच्या प्रीतीला ताण देऊं लागलों. पण तिची निष्ठा कधीं ढळली नाहीं, आपल्या सर्व खेळण्याकडे तिनें दुर्लक्ष केलें, प्रेम तिनें व्रतासारखें पाळलें. आपल्या आडमार्गी वृत्तीला आणखी चेव आला, आपण निराशेचीं स्वप्नें मुद्दाम बनवूं लागलो. दोनदां तीनदां तिनें आपल्या मूर्ख बरळण्याची समजूत घालायचा प्रयत्न केला, पण आपली बुद्धी विनाशकालानुरूप विपरीत झाली. 'आपलें लग्न होणें

शक्य दिसत नाहीं आपल्याला ' असें पुन्हां एकदां म्हणून आपण भविष्य-काळचें काळेंकुट्ट चित्र उभें केलें.

' एकच वर्ष थांबायचें, मग आपण दोघेंही स्वतंत्र होऊं ना ? '

यावर आपण आणखी कांहीं अडचणी उभ्या केल्या.

' असं वाटतं तर एकंदर आपल्याला ? ' एकाएकीं विजेसारखे तिचे डोळे चमकले. तिच्या आवाजांत पोलादी तारेची झार आली होती. पण आपल्या अकलेची पुंजी केव्हांच संपली होती, सांवरून घेण्याची शेवटची संधी आपण सोडली.

' होय ' आपण बेदरकार मूर्खपणाचें उत्तर दिलें.

" तुम्ही जर असं म्हणत असलांत तर मग स्पष्टच होऊं द्या सगळा निकाल—आपलं लग्न होणं शक्य नाहीं ना ? ठीक आहे, कधींही होणार नाहीं ! हीच आपली शेवटची भेट—जन्मांत मला तुमचं तोंड पाहायचं नाहीं. तुमच्यानंतर मला मात्र आयुष्यांत दुसरा पुरुष नाहीं. '

ती तिरमिरी आल्यासारखी निघून गेली—ती कायमचीच, पुन्हां कधींहि तिचा आपल्याशीं प्रसंग आला नाहीं.

मूर्खाला हरपलें श्रेय देखील हरपलें म्हणून लौकर कळत नाहीं. आपण अत्यंत दीनवाणें पत्र तिला लिहिलें—व तावडतोब तें तसेंच्या तसें परत आलें. आपण पुन्हां बेछूटपणाचें नाटक केलें—किती केंविलवाणें नाटक तें. नाहीं म्हणायला आपल्या कामांत दांतओंठ खाऊन पडून चांगलें यश मिळवून आपण अलकावती सोडली.

जन्माच्या गांठी सुटत नाहीं म्हणतात, पण त्या गांठी सोडण्यापेक्षांहि अवघड, अशक्य गोष्ट कोणती असेल तर तुटलेले पाश जोडण्याची. नंतर ती मुंबईला कॉलेजमध्यें आल्यावर दर वर्षी एकदां जिवाचा हिय्या करून एकदां तरी भेटण्याचे व्यर्थ प्रयत्न आपण केले. तिच्या चमत्कारिक बापाकडून सुद्धां मदत मिळविण्याचा प्रयत्न केला, पण त्यानें सगळाच विचका करून टाकला. काकांच्या कानावर गोष्ट गेली, काकूंनीं धास्ती घेतली आणि लौकरच जनरूढिप्रमाणें लग्न, परीक्षा, बेकारी हे संस्कार

झाले–आणि शेवटीं या चाकोरींतल्या जीवनाच्या शेवटच्या आश्रमांत आपण प्रवेश केला !

—खरेंच, उद्यां ऑफिसांत वेळेवर पोंहचेन कां मी ? जाऊं दे, आहे ती रात्र आपली–आतां तरी काय नुसते हळहळीचे मणीच ओढायचे आहेत—

वीस वर्षांत पहिल्यापहिल्यानें चारपांचदां ती दिसली होती, पण तिची करारी नजर कशी आरपार जात असे ! ओळखल्याचा सौम्यपणा त्या क्रूर निळ्या डोळ्यांत कधीं दिसला नाहीं. शेवटचें दर्शन म्हणजे अलकावतीनंतर आठदहा वर्षांनीं प्रवासांत एका जंक्शनवर दिसली होती तेव्हांचें. प्लॅटफॉर्मवर स्टेशनाच्या नळाचें पाणी ती ओंजळीनें पीत होती. चारपांच रुपयांचें रंगवलेल्या मलमलीचें कसलेसें पातळ नेसली होती–बी. ए. झालेली बाई ! तिची आकृति जास्तच सुंदर दिसली, तिचें मुख हांसरें दिसलें, ती सुखांत असावीसें वाटलें. आपण तिला न दिसण्याची खबरदारी घेतली हें बरेंच झालें एक प्रकारें; उगीच आपल्या चेहऱ्यावरची व्याकुलता तिला दिसली असती...

दहाएक वर्षांपूर्वी तिनें लग्नही केलें म्हणतात, दुसऱ्या जगांत गेली ती आतां–तिचा पती कसा असेल ? तिच्या तेजाला फिकें पाडणारी शक्ति त्याच्यांत असेल–कां कालगतीनें झालेल्या तिच्या निस्तेज मूर्तीचा, तिच्या ओसरणाऱ्या तारुण्याचा तो अचानक स्वामी झाला असेल ? ती स्वतः आतां कशी दिसत असेल ? माझ्या कठोर बनलेल्या दृष्टीला ती कशी दिसेल ? तिला व्यवहारी जीवनाची सामान्य कळा आली असेल ? कां हट्टी निग्रहानें तिनें आपलें तारुण्य टिकविलें असेल ? सौंदर्य आणि जीवन ताजें ठेवण्याची स्फूर्ति देण्याइतका असामान्य पुरुष तिचा पति असेल कां... वीस वर्षें—

वीस वर्षें !

त्याच्या तोंडून एक अति कटु, कठोर उद्विग्न असा हास्याचा ध्वनि निघाला. तात्कालिक मोहाला बळी पडून जुन्या जखमा पुन्हां उघडायचें प्रायश्चित्त भोगणाऱ्याचा तो आवाज होता. दक्षिणेकडच्या वाऱ्यानें

आणलेली रात्रींची थंडी त्याला चांगलीच झोंबूं लागली होती. शरीराच्या रक्षणासाठीं मनाच्या समाधीपासून उठणें त्याला प्राप्त झालें होतें. तो सावकाश उठला.

"कोण आहे तें ?"

त्यानें चपापून समोर पाहिलें, तो आवाज अनोळखी—तरी पण ऐकल्यासारखा वाटत होता.

"कोण पाहिजे आपल्याला ?" त्यानें विचारलें.

"नाहीं—मला वाटलें कीं येथें कोणी नाहीं, इतक्यांत तुमची चाहूल लागली—" बोलतां बोलतां ती व्यक्ति पुढें आली होती. तो विस्फारित नेत्रांनीं तिच्याकडे पहात होता.

डोक्यावरून घेतलेल्या शुभ्र पातळाखालून तिचे अर्धरुपेरी केंस सैल बांधलेले दिसत होते. विस्तीर्ण कपाळावर चिंतेच्या रेषा उमटलेल्या होत्या. निस्तेज पण बुद्धिमान डोळ्यांभोंवतीं कालानें आपलें काळे बोट फिरविलें होतें, गाल पातळ व सैल झालेले, आणि एके काळच्या गर्विष्ठ नासिके-पासून त्या गालांपर्यंत जराराक्षसीनें आपले दोन निर्दय प्रहार केलेले होते. घट्ट मिटलेल्या ओठांना कठोर शक्ति प्राप्त झाली होती.

अविश्वासाच्या घोगऱ्या आवाजानें तो बोलला,

"कोण, इन्दु ?"

त्या स्वच्छ चंद्रप्रकाशांत त्याच्याजवळ येऊन, न्याहाळून पाहून ती उद्गारली,

"सागर !"

सागर ! किती दिवसांनीं त्यानें हें आपलें नांव ऐकलें. योगक्षेमाच्या घाण्याला जुंपून घेण्याचे वेळीं हें फॅन्सी नांव सोडून सखाराम हें नांव धारण करण्याची खबरदारी त्यानें घेतली होती.

"तुम्ही इथें कसे ?"

"या बाजूनें जात होतों, दमलों म्हणून जरा विश्रांतीसाठीं बसलों झालं."

(आपण आचरट निदिध्यास तिला न कळलेलाच बरा !) "तूं—तुम्ही कशा आलांत ?" त्यानें उलट विचारलें.

तिनें त्याच्याकडे पाहून खिन्नपणें हास्य केलें, "आलें सहज फिरायला," ती त्याच्यापलीकडे त्या ओस्थ्यावर बसली.

न बोलतां त्याला आपल्या स्वामित्वाची जाणीव झाली. हात लांब करण्याचा अवकाश होता—ती त्याची होती. पण ती आपली आहे हें कळूनही त्याचा हात लांब झाला नाहीं. तो निश्चल बसून राहिला. आम्रमंजरीसाठीं तपश्चर्या करणाऱ्या भ्रमराला अखेर सुकलेली कोय मिळाल्यासारखें त्याला वाटत होतें. स्वप्नसृष्टींतल्या डंवरलेल्या गुलाबांचें इतकें प्रत्यक्ष निर्माल्य पुढें उभें करणाऱ्या विधीचें त्याला कौतुक वाटलें. ज्या सौंदर्यदेवतेची तो आराधना करीत होता तिची ही पुराणमूर्ती पाहून त्याच्या मनांतलें आशेचें मंदिर कोसळून पडलें. कल्पनेच्या सुंदर सृष्टीचें इतक्या भीषण वास्तवतेंत झालेलें साफल्य त्याचें काळीज चरचरां कापीत गेलें, तो पुन्हां कठोरपणें हांसला.

"सागर, तुम्ही बोलत कां नाहीं ?" तिनें समोर पहात विचारलें.

एके काळीं या शब्दांनीं सृष्टीचें संगीत त्याच्या कानांत सुरू झालें असतें, आज त्यानें नुसता निश्वास सोडला.

"मला बोलायला कांहीं उरलें नाहीं."

"मग मी बोलूं ?"

"तूं काय बोलणार ?"

"जें तुमच्यानें व्यक्त होत नाहीं तें."

"मला कांहीं व्यक्त करायचें नाहीं——"

"कांहीं नाहीं ? सागर, तुम्हीं इथें कां आलांत, खरं सांगा."

"स्वप्नाच्या मागें——"

"तें स्वप्न खरं झालं ना आतां ?"

"कसं सांगूं—मला पशूसारखं वाटतं तें बोलायला——"

"काय ?"

" तें स्वप्न विलयाला गेलं—"

" आशेच्या सीमेपलीकडे ? "

तो कांहींच बोलला नाहीं.

" बोला, मोकळ्या मनानें सांगा—मला—मला कांहीं सुखदुःख नाहीं त्याचं." अतुल शौर्यानें ती शक्य तितक्या नैसर्गिक आवाजांत म्हणाली.

" बोलेन, पण इन्दू आधीं तूं सांग—तूं सुखी आहेस ना ? मला तुझ्यासाठीं कांहीं करतां येण्यासारखं आहे कां ? "

थोड्या वेळानें ती म्हणाली,

" मी जगाच्या व्याख्येनं सुखी आहे, मला कांहीं कमी नाहीं, मी सर्वस्वी स्वतःची मुखत्यार आहे—माझ्या मनाला एकच ओढ होती—आणि त्या ओढीमुळेंच आज अचानक स्टेशनवर तुम्ही दिसल्यावर तुमच्यामागें आले. "

तरी तो कांहीं बोलला नाहीं. क्षणभर स्तब्धतेनंतर तिनें पुन्हां विचारलें,

" सागर, स्वप्नाचा नाश झाला म्हणून तुम्ही म्हणालांत, तो आतां मला पाहून झाला असंच ना ! "

तो मुग्ध राहिला. पराजय झाला तरी नेटानें तिनें लढाई चालू ठेवली,

" माझ्या रूपावर तुमचं प्रेम होतं कां ? "

" मुळींच नाहीं. " तो आवेशानें उद्गारला, " तुझं रूप केवळ स्मृतिचिन्ह म्हणून माझ्या हृदयांत होतं—तुझ्या तारुण्यावर माझ्या तारुण्याचं प्रेम होतं—त्या प्रेमाची फलश्रुति झाली नाहीं तरी त्याची आठवण तेव्हांच्याच स्वरूपांत माझ्या हृदयांत आजपर्यंत जागृत होती; आजची तूं—ती इन्दू नाहींस, या दुष्ट जगाचे वीस वर्षांचे संस्कार घेऊन तूं माझ्यासमोर आली आहेस. त्या इंदूची तूं छाया आहेस—तूं दिसतांक्षणीं ती इन्दू कायमची नष्ट झाली ही भयंकर जाणीव मला आली—"

" वीस वर्षांपूर्वीचे सागर तुम्ही आहांत कां ? "

" नाहीं. पण स्वतःविषयींचें इतकें निर्दय सत्य डोळे उघडून कधीं पहावंसं वाटत नाहीं—"

" खरं आहे, ते लोकांनींच सांगावं लागतं ! " ती दुसरीकडे पहात म्हणाली. तो एकदम उठून उभा राहिला.

" इन्दू मला क्षमा कर, वीस वर्षांच्या वैरी जगानें माझ्या वाचेला इतकी पाशवी निष्ठुरता दिली—"

तिनें त्याला हात धरून खालीं बसवलें.

" सागर, हें मला समजत कां नाहीं ? तीं वीस वर्षं मीही काढलीं ना ? मीं मोठ्या विस्मृतीच्या आनंदांत होतें अशी कां तुमची समजूत आहे— "

या वेळीं मात्र तिला हुंदका आवरला नाहीं. यदृच्छेनें त्याचा हात तिच्या पाठीवर गेला—यत्किंचितही मधुर संवेदना या स्पर्शानें त्याच्या अनुभवास आल्या नाहींत.

" इंदू, इंदू, हें काय, तुझा करारीपणा कोठें गेला सगळा ? "

" कोणासाठीं आतां करारीपणा ? " ती स्फुंदून रडूं लागली. त्यानें तिला हृदयाशीं धरलें. त्यांचीं शरीरें थोडींदेखील थरारलीं नाहींत, मायेच्या, सान्निध्याच्या, शारीरिक विसाव्याच्यापेक्षां कोणत्याही भावना त्यांच्या ठायीं प्रदीप्त झाल्या नाहींत.

" तेव्हांच्या ज्वाला जाऊन आतां अंधूक अंगारसुद्धां राहिला नाहीं, " तो हलक्या आवाजांत बोलूं लागला. " प्रणयाच्या ऊर्मी हळूहळू मरून गेल्या, प्रेमाचे झरे आटून गेले. प्रीति ही आतां दोन शक्तींची एकवाक्यता राहिली नाहीं. त्या शक्ति तारुण्याबरोबरच कायमच्या लुप्त झाल्या. सर्व प्रकारच्या भावनांची तीव्रता गेली. मस्ती केव्हांच नाहींशी झाली. पोळलेल्या जुनाट जीवांत एकच प्रकारचें प्रेम करायची शक्ति शिल्लक आहे. दोन समदुःखी मानवी प्राण्यांचं प्रेम—माया, ममता, आपुलकी, हे सगळे प्रेमाचे बिनधोक मार्ग तेवढेच तारुण्याला पारखे झालेल्यांना शिल्लक राहिले आहेत ! इन्दू—"

तिनें सर्वस्व वाहिल्याच्या, शरणागतीच्या, शिणल्याच्या दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें. तिच्या वर केलेल्या मुखाचें, थंड ओठांचें त्यानें भक्तिपूर्वक चुंबन घेतलें. तिच्या चेहऱ्यावर दिसणाऱ्या काललेखांकडे पाहून त्याला अपरिमित करुणा आली—आणि त्याच्या काळवंडलेल्या, कृश, सचिन्त व कठिण चेहऱ्याकडे पाहून तिलाही कळवळून आलें...

जीवनाचीं उन्हें उतरायला लागल्यावर वैराण रानांत अचानक एकमेकांना भेटलेले ते दोन जीव, काळरात्रीची पर्वा न करतां त्याच शिथिल आलिंगनांत बद्ध होऊन राहिले......

त्यांचा जुना मित्र, माळावरचा दक्षिणवायु आतां पूर्वीपेक्षां मंद आणि शीतल वाहात होता......



# उपसंहार

[ उपसंहार हा शब्द बहुतेक युद्धाच्या परिभाषेंतून साहित्यांत आला असावा. युद्धाच्या मुख्य संहारांतून कोणी जखमी जायबन्दी लोक निसटले असले तर नंतर जाऊन त्यांचा पुरा खातमा करणें हा 'उप-संहार' या शब्दाचा खरा अर्थ कदाचित् असेल. पुस्तकाच्या शेवटचा उपसंहार त्याच कार्याचा अन्वर्थक नसेल कशावरून? पुस्तकांतल्या मुख्य मजकुरानें वाचक घायाळ होऊन त्यांच्यांत थोडीबहुत धुगधुगी उरलीच, तर तिचा निकाल लावण्यासाठीं उपसंहाराच्या अखेरच्या अस्त्राची योजना बहुधा असावी. ही उपपत्ती अर्थातच युयुत्सु वाचकांसाठीं आहे-कीं जे वाचक पुस्तकाकडे लेखकाचें युद्धास आव्हान या दृष्टीनें पाहतात. ]

वाळूचा किल्ला पुष्कळ वेळ खटपट करून बांधल्यानंतर एकदम पाडून टाकण्यांतही एक प्रकारचा जंगली आनन्द वाटतो; त्याप्रमाणेंच या गोष्टी बाभळवनांतल्या दोन निरपराध जीवांना, लोक-लगट ( Mass Contact ) करण्यास निघालेल्या कांहीं बावळट शहरी माणसांनीं सांगितल्या, ही कविकल्पना जमीनदोस्त करण्यांतही एक प्रकारची मौज वाटणें साहजिक आहे. शहरीं माणसें कितींही बावळट असलीं तरी तीं असल्या गोष्टी-आणि अशा भाषेंत-कोणाला सांगायला काट्याकुट्यांतून रात्रींच्या वेळीं रानोमाळ हिंडतील हें सामान्यतः अशक्यच. तेव्हां ही सगळी कल्पनाच फाजील ताणलेली आहे असें ठरतें. मग या गोष्टी सरळ सांगायच्या सोडून एवढा खटाटोप करण्याचें कारण काय होतें? हा प्रश्न साहजिकच कोणी विचारील. या प्रश्नाच्या उत्तरांतच पुस्तकाच्या नांवाचें लंगडें समर्थन आणि कदाचित् त्या चुकीचा कबुली जबाबही सांपडेल.

एके समयीं खेड्याच्या वातावरणाला तेजी आहे हें पाहून लेखकानें असा विचार केला कीं या मोक्याला आपणही थोडासा भाव खाण्याचा यत्न करावा. 'खेडुत', 'भूमिजन', 'किसान' इत्यादि शब्दांचें पेंव फुटल्याचा तो मोसम वाचकांस स्मरतच असेल. त्या हिरिरींत 'बाभळवनात'

या 'लोकछटें'(Pastoral) ची कल्पना सुचली. एकदां कल्पना सुचल्यानंतर लेखक कोणाला आवरणार आहे? ताबडतोब ती कल्पना कागदावर उतरली. त्यांत किसन व राधा या जोडीला अखेर आरामांत आणून ठेवल्यावर, पुढें काय? हा प्रश्न उभा राहिला. त्या प्रसंगीं लेखकाला वाटलें कीं आपण इतक्या गोष्टी लिहिल्या पण किसन व राधा अशा माणसांना त्यांचा काय उपयोग? ती त्यांना शिक्षाच व्हायची. तेव्हां ती शिक्षा स्वतः करण्याचें पाप टाळण्याकरितां, लोकलगटीस निघालेल्या शहरी माणसांची त्या कामावर नेमणूक केली व याप्रमाणें लोकछटेच्या सांगतेसाठीं बाभळवनात या गोष्टी येऊन पडल्या. आतां हें आपण बरें केलें नाहीं असें लेखकाला कधीं कधीं वाटत नाहीं असें नाहीं, पण असें आयुष्यांतल्या किती तरी गोष्टींबद्दल वाटतें. त्यांच्याबद्दल हळहळ करीत बसूं म्हटलें तर बाकीच्या कार्यक्रमाला वेळच राहाणार नाहीं. त्यांतल्या त्यांत समाधान इतकेंच कीं, 'नांव आवडलें म्हणून पुस्तकाला दिलें' हा शिलकी बचाव लेखकाजवळ नेहमीं राहीलच.

वास्तविक आपलें लिखाण बहुजनसमाजानें रसास्वाद घेण्यासारखें नाहीं याबद्दल लेखकाला हळहळण्याचें मुळींच कारण नाहीं. स्वतः लेखक ज्या वर्गांतला असतो त्या वर्गाला जरी त्याचें म्हणणें कळलें तरी पुरें आहे. तें म्हणणें बहुजनसमाजापर्यंत अट्टाहासानें पोहोंचविण्याची जरूर नाहीं व त्या समाजासाठीं आपली भाषा बदलण्याचीहि त्याच्यावर जबाबदारी नाहीं. ज्या त्या समाजाला कळणारी भाषा त्या समाजवाल्या लेखकानेंच लिहिण्यास हवी. त्या दृष्टीनें, व All art is selective या जाणिवेनें लिहिलेलें. ललितवाङ्मय लोक–लगटीसाठीं निरूपयोगीं आहे यांत वाईट वाटण्यासारखें कांहींच नाहीं.

तरी देखील किसन व राधा यांना आपल्या गोष्टी कळत नाहींत. या नाइलाजाच्या गोष्टीबद्दल कधींकधीं असंतोष वाटणें स्वाभाविक नाहीं काय?

———

# आमचीं पुस्तकें



| | रु.आ.पै. |
|---|---|
| (१) आजचें स्वराज्य–ले. वा. वा. जोशी, B. A. B. T. | ०–६–० |
| (२) काम आणि कामिनी–ले. कु० प्रेमा कंटक. | २–८–० |
| (३) जीवन–प्रकाशन—मोठ्यांच्या छोट्या गोष्टी. ले. साने गुरुजी. | २–०–० |
| (४) सीतास्वयंवर–ले. प्रो० द. सी. पंगू, M. A. | २–८–० |
| (५) पूजन–ले. वि. स. खांडेकर. | १–८–० |
| (६) करवीराच्या कळया | १–४–० |
| (७) सांजवात. | ०–१०–० |
| (८) हिंदूंचा आजचा कायदा–ले. र. दि. कुलकर्णी | ०–८–० |
| (९) मावळता चंद्र ( सामाजिक कादंबरी )– ले. बा. भ. बोरकर. | १–४–० |
| (१०) पुष्पपराग ( लघुकथा ) – ले. कु. कुमुदिनी प्रभावळकर, B. A. | १–४–० |
| (११) चौपाटीवर ( कथा व प्रबंध )–ले. डॉ. वाळिंबे. | १–४–० |
| (१२) बेसूर संगीत ( सामाजिक कादंबरी ) ले. कुमुदिनी प्रभावळकर, B. A. | १–४–० |
| (१३) भडकल्या ज्वाला अर्थात् आगामी महायुद्ध. ले. श्रीकृष्ण रामचंद्र पोतनीस, एम्. ए. एल्एल्. बी. | १–८–० |
| (१४) साम्राज्य व स्वराज्य–ले. दा. न. शिखरे, एम्. ए. | १–०–० |
| (१५) विवाहानंतर–ले. प. स. देसाई. | १–८–० |
| (१६) महात्मा कीं मोहात्मा ?–ले. वि. वि. दीक्षित | २–८–० |
| (१७) उमज पडेल तर–ले. ना. ह. आपटे | १–८–० |
| (१८) बालसुहृद्–ले. गो. रा. चोळकर | ०–१२–० |